41] [14-1-1814

श्री.

यादी लस्करात सरंजाम येणेप्रो। आहे. सुमा आर्बा अशर मयातैन व अलफ माहे मोहरम छ २१ रोज.

२०२ घोडी वगैरे पागा शीलेदारसीबंदीसुद्धा
 १४० स्वार
 १६ खासी घोडी खास...कदील
 ४१ कारकुन वगैरे दरकदार सुधा
 १०५ तटे रास
 ———
 २०२

६४ उंट नंग
२२ हाती नंग
४८ बेलदार
१२९ सीबंदी पायदल
 २० अरब
 ३० सीदी
 ९ हमेल
 ५१ जीलीबंचे लोक
 ५ हेटकरी
 १४ गारदी
 ———
 १२९

१०९ [illegible]
 [illegible]

२ चोबदार
१ चाबुकस्वार
१० बेलदार तबेलदार
१ गणपतीराव काले
४ कामाठी
८ भोई
४ मशालची
१ आच्यारी
२ पाणके ब्राम्हण
१ नारायेण खी ......
३ गाडीवान दमणींचे
१ धोबी
१ नालबंद
१ दर्जी
१ तांबोली
१ घडयालची
३७ मोतदार
१९ सारवान दभासी सुा
४ फरास
१ साडणीस्वार
१ भंग्या

---

१०९

४०० कीरकोल पागानीहाय कडील खासदार वगैरे कडील आजमास.

अपूर्ण

41]

An incomplete list of men and animals in the Camp. The portion covers shiledar and Sibandi Pāga (cavalry), Sibandi infantry and the khās (Mahārāja's personal) servants charged to the military department.

---

42] [17-1-1814

पो छ १ सफर माघ श्रुा २

सोमवार,

श्री.

सेवेसी सीवराम सदाशिव सा नमस्कार विज्ञापना. ता पौष वा ११ सोमवार पर्यंत मुा म्हईसा नजीक डाकुर येथें यथास्थित असे विशेष. आपण छ ८ जानेवारीचे पत्र अजम अक्रम साहेबाचे नांवाचे पाठवीलेत. काल रविवारी दोन प्रहरा पावले. ते पत्र तेच वेलेस वांचून दाखवीले. त्याचा बडोद्यास गेल्यावर जाब लीहू म्हणून सांगितले. साहेबाची स्वारी वा १४ गुरूवारी सायंकाली बडोद्यास दाखल होईल. तेथें पांच च्यार दिवस राहून लागलेच मुंबईस यावयाची तयारी करून यावयाचा बेत आहे. कपडबंदास स्वारी मंदवारी नऊ कलाक वाजतां आली. तेथें बच्चा जमातदार याची भेट जाली. एक दिवस अजम खानसाहेब याचे मर्जिकरितां राहीले. ते दिवसी प्रातःकाली च्याहा बचा जमातदार याचे लष्करांत जाला. तेथें सर्व मंडली बरोबरची व अजम खान साहेब याचे मंडलीसुद्धा मेजवानी करून सर्वांस वस्त्रे दिल्ही. सायंकाली कपडबंदचे ठाण्यांत साहेबाचे खाण्याचा बेत होता. परंतु दोन प्रहरा साहेबाची प्रकृत बीघडली. सेतांश होऊन ज्वरही आला मग खाने डेऱ्यासच आणवून तेथें खाण्याचा बेत केला.

पाहाटेस ठाण्यांत जावयाचा बेत होता. परंतु प्रकृत नीट नाहीं सव्व साहा घटीका रात्र राहाता सडे स्वारीनीशी आठ वाजतां मुकाम मारी आले. आतां येथें कांहीं आराम आहे. कलावे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

42]

Shivrām Sadāshiv writes from Mhaisa near *Dākor to Gangādhar Shāstri that Carnac was returning* shortly to Baroda, from where he would proceed to Bombay, within a week. He adds that Carnac had halted at Kapadvanj for a day as a guest of Bachcha Jamādar and though he took tea with the latter he could not owing to an attack of fever, attend the dinner given in his honour.

---

43] [31-1-1814

श्री.

चीरंजीव राजश्री बापाजी आरकाटकर यासी गंगाधरशास्त्री पटवर्धन कृतानेक आसर्वािद उपरी ता माघ श्रा १० सोमवार क्षेम आसे. विशेष हणमंता जासुद याजबरोबर पत्र पाठविले ते पावले. "घोडी नवी विकाऊ आली आहे. फार चांगली कींमत पांचशे बीन बटा. सीवाय जकात पडेल." म्हणोन लीा. त्यास राजश्री आणासाहेब याचे नजरे आल्यास घ्यावी. वर्षफल पाा ते पावले. सुजातखान येथे आले. त्यास दील-दारखान व बडेखान व सेख आजू ऐसे त्रीवर्गास येथे पाठवावे. लोभ कीजे. आसर्वािद.

43]

Gangādhar Shāstri (Poona) asks Bāpāji Arkātkar

(Baroda) to purchase a mare recommended by him if Ānna Saheb (?) approves it. The price of the mare was Rs. 500. Receipt of the annual predictions sent by Bāpāji is acknowledged.

---

44] [2-2-1814

पो माघ वाा ४ भौमवार संवत १८७०.

श्री.

चिरंजीव राजश्री दादा यांसी गंगाधरशास्त्री पटवर्धन आशिरवाद उपरी. येथील कुशल ताा माघ श्ुाा १३ गुरुवार पर्येत येथास्थित असें विशेष. वसंत पंचमीचे दिवशी आदालतीची वस्त्रे होऊन इन्साफाचा कारभार शहरांत परभुदासाचे हवलीत व्हावयाप्रेाा ठरले. त्यापक्षीं आम्हीं " एक वल प्रातःकाली दरबार करून दोनप्रहरानंतर येक वाजल्यावर अदालतीत जाऊन तेथील न्याय मनसुबीचे मनास आणीत जावे." येवीसी श्रीमंतास विनंती करून हेंच पत्र त्यास दाखवावे. म्हणजे तेही याप्रेाा तुम्हास सांगतील. लोभ कीजे हा आशीर्वाद.

44]

Gangādhar Shāstri writes to Dāda *i.e.* Yeshwantrāo Godbole asking him to submit the present letter to Fattesingrāo with a request that he (Dāda) may be allowed to attend Palace Office (daily) in the morning and later begin his judicial work after 1 P.M. in the law Court opened last fortnight.

45] [19-1-1814

पो माघ श्रुा ४ संवत १८७०.

श्री.

चिरंजीव राजश्री भाऊसाहेब व दादा व बाबा यासी प्रति गंगाधर-शास्त्री पटवर्धन कृतानेक आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। पौष वद्य १३ बुधवार मुकाम जंजिरे मुंबई येथें क्षेम आसे. विशेष तुम्हीं छ २० मोहरमचे पत्र व रोजनीशी पा। ती पावली. लीा। मजकुर सवीस्तर समजला. राजश्री बापु मैराल याजकडील पत्रें व रोजनीशी आली ती पा। आहे व कंपनी सरकारचे पत्र लीहीले आहे त्याची नकल पा। आहे. ही पाहोन श्रीमंतास दाखवोन साहेबाकडे रा। करावी व साहेबाचे पत्रही श्रीमंतास दाखवोन साहेबाकडे रा। करावे. आपण तीलधेनु दिल्हे याचे लीहील्यावरोन परम समाधान झाले. याप्रो।च हमेशा धर्मकृत्यें करोन आमच्या कर्णाची तृप्ती करावी. सविस्तर साहेबाचे पत्रावरोन कलले. लोभ कीजे हे आसीर्वाद.

45]

Letter from Gangādhar Shāstri (Bombay) to Viṭṭhalrāo Bhāu and others. The Shāstri is glad to know that Bhāu has given the *tildhenu* to Brahmins.

---

46 6-2-1814

पो माघ वा। ८ मंदवासर संवत १८७०

श्री,

चिरंजीव राजश्री दादा व बाबा यासी गंगाधरशास्त्री पटवर्धन आसीर्वाद उपरी येथील कुशल ता। माघ वा। २ रविवार पर्यंत मुंबई येथें

येथास्थित असे. विशेष. तुम्हीं पत्रं श्रा॥ १० सोमवारचे पाठवीले ते पावले. नाना फणसे याची पत्रे आली "पेंढारी दक्षण प्रांती गेले. आपला सरंजाम तेथें आहे. तेथें सरकारची पत्रें पाठऊन हुशारी करवीली येथील पागा व सीलेदार राजश्री कुशाबा तात्यासमागमे देऊन वाघोडे व सावखेडे येथें नाईकड्यांनीं दंगा केला तिकडे रा। करतो व एक सवदागर हाती विकावयास घेऊन आला तो साडेबावनशें रुपयास श्रीमंतांनीं खचीत केला. तो हाती श्रीमंताचे मनात घ्यावयाचा आहे व मार जमातदार पालनपुरकर याचा भार व चिरंजीव मुलाच्या प्रकृति येथास्थित आहेत. त्याची रा। करणे ती पेंढारी याचे बातमीचे संधान राखुन रवानगी करतो" म्हणोन विस्तारे लीहीले ते कलले. त्यास पेंढारी याचे बातमीचा मार समजला. येथेंही बातमी याप्रााच आहे. सर्वांस पत्रें पाठऊन संरजामाची हुशारी करवीली. उत्तम केले. राजश्री कुशाबातात्या यांची रवानगी ली प्रो पागा व सीलेदार देऊन करावी. श्रीमंताचे मनात हाती घ्यावयाचा आहे त्यास साडेबावनशे रुा श्रीमंताचे मर्जीप्रो देऊन हाती घ्यावा. मौजे नेंद्रे येथील कोल्याचा भारी उपद्रव. वाटा मारीतात. येविसी राजश्री लक्षुमणपंत भाऊ जंबुसरकर याचे पत्र आले ते तुम्हांकडे पाहावयास पाठविले आहे. याजवरून कलेल तरी याचा बंदोबस्त करावा. पेंढारी याची आठावीसीत गडबड आसलेयास रा। जलदी न करावी. वाटेची सुमता पाहून मग कर्तव्य तसें करावे. लोभ कीजे हें आसीर्वाद. हाती आंबावारी जोगता असलयास घ्यावा. हें आसीर्वाद.

46]

Letter from Gangādhar Shāstri dated Bombay 6-2-1814 to Marāthe and Godbole acknowledging their letters obout (1) the arrival of the Pendhāris in Surat Atthāvisi; (2) the proposed despatch of Krishnarāo Bhagwant to Wāghodia-Sankheda to check the

nāikdās and (3) the purchase of an elephant by the Mahārāja. The Shāstri gives his instructions on all these points.

---

47] [8-2-1814

पो माघ वा ९ रविवार

संवत १८७०

श्री.

चिरंजीव राजश्री दादा व बाबा यांसी आशिर्वाद उपर येथील क्षेम ता। माघ वद्य ३ मंगलवार पावेतो मु॥ जंजिरे मुंबई येथे क्षेमरूप असो. विशेष काल व आज व परवा रात्रौ मिलोन गवरनर साहेब व मी व कपतान कर्नेक साहेब त्रिवर्ग बसोन पुणे प्रकर्ण व पेंढारी याचे आगामी कृत्य करणे याची बोलणी सुरू झाली. त्यांत दुजत्रासीपणा रीसीदेंट साहेब आले येणे करोन मला जातीनसी व गायकवाड सरकारास नफा बहुत झाला. याचे कारण येथील साहेबाला हे हिंदुस्थानी समजतात परंतु कर्नेक साहेबाची जातीची वहीवट तेणे करोन गायकवाड सरकारचे हरद्र उघड झाले. त्यावरोन आमचे जाणे ठरोन आज आतांच येथोन येथीलचे सामान संजाम पनवेलीस रा। केले. त्याणी तेथें जावोन तेथुन उदईक कुच करोन खोपवलीस मुकाम करावा. आम्हीं उदईक दहा वाजता नीघोन पनवेलीस सहा घटका रात्रींस जावुं. याप्रो। बेत झाला आहे. आज आपले प्रकर्णी कामाकाजाचे कागद तयार होत आहेत. सबब गवरनर व रीसीदेंट व मी असे त्रीवर्ग येकत्र आहों. प्रायशा आज साहा वाजस्ते पावेतो कामातच जाईल तुम्हांस सविस्तर कचा भार पुणेयाहून लीहीन. तुमची पत्रें डाकेंत हमेशा चालु असावी हे आशिर्वाद.

48]

Letter from Carnac to Gangādhar Shāstri, who being ill was taking an (English) doctor's medicine at Poona.

---

49] [26-7-1814

श्री

राजश्री गंगाधर कृष्ण मुतालीक गोसावी यांसी आखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य

श्रो फतेसिंगराव गायेकवाड रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लीहीत जावे. विशेष तुम्हीं पत्रे छ १७ रजब पावेतोची व सरकार कामासंमधी बोलन्याच्या याद्दी पाठविल्यात त्या यथानुक्रमे पाऊन मजकुर सविस्तर ध्यानास आले. इकडून वरचेवर उत्तर न गेल्याचे कारण दरम्यान प्रकृतीस विशुचीका होऊन वाखा जाहला होता तो उपच्यारे करोन आरोग्य निखालस जाले. राजश्री पंतप्रधान याजकडील जाबसाल कंपनी सरकारचें मध्यस्तीवीना उलगडेल असे नजरेस येत नाही त्यापक्षी तहनाम्याचे आकरावे कलमांप्रो कंपनी सरकारास दरम्यान होणे प्राप्त. ते होईल. त्याची चिंता नाही. येथे गोविंदराव बंधुजी याणी आमचे नांवची पत्रे पंतप्रधानाचे सरकारात दाखवीली त्यावीसी तेथील रीसीदेंट याचे लिहिणें मुंबईस येऊन येथे आल्यावरून आजम कपतानं कर्नेक साहेब याणी आम्हास पुसीले. त्याचे उत्तरे निखालस दील्ही. ते सविस्तर रो यशवंतराव बापु गोडबोले व येशवंतराव बापुजी मराठे याणी तुम्हास लीहीलेच आहे. त्याप्रो बंधुजीवीसी तुम्ही तेथील रीसीदीट यासी बोलावे. दुसरे तुमचे येणे कामाचे आर्धावराने (?) दिवसगत लागेलसे दिसते. येथे दरमाह करी (?) वगेरें चीठ्या बंद जाल्या आहेत. पोतदार याचा खात्याचा साळगुदस्तचा हीसेब

करोन त्या ऐवजाचे पुढील वराता सालाबाद प्रो। त्याऊन घ्यावयाच्या, त्या माहालानीहायेचे मामलतीचे बंदोबस्त जाल्यानंतर होणार पुढे नवे कोटे करावयाचे. तेव्हा दरमाह वगैरे नाळी खर्चांचे सुरलीत चालेल. तसे आमदाबादचे मामलतीची घालमेल होण्याची ठरली त्यापेक्षा सीबंदी वगैरे खर्च कमी करावयाचीही योजना ध्यानास आली पाहिजे. यास महिनाभर अवकाश आहे. तसे तुमचे उत्तर यावयासही सदरहु वेळ पाहीजे. याजकरितां आगाऊ सूचना लीहीली आहे. त्यास कसे कोणत्यारीतीने मामलतीचा व फौजेचा खर्च कमी करावयाचा व नेमणुकी वराता चालवाव्या बंदोबस्त करावयाचा त्यावीसी तपसीलवार उत्तरे पाठवावी वरकड दीनचे वृत्त उभयता लीहीतच असतील. रा। छ ८ माहे साबान सुमा खमस आशर मयातेन व अलफ बहुत काय लीहीणे हे विनंती. (२६-७-१८१४)

पो। २२ साबान श्रावण वा। ८ मंगलवार सन खमस अशर मयातेन मुा। पुणे. (९-८-१८१४)

49]

Letter from Fattesingrāo to Gangādhar Shāstri. The writer says that he was suffering from diarrhoea but now is in perfect health. He does not think that a settlemeut with the Peshwa can be arrived at without the Company's intervention. After referring to Govindrāo Bandhuji's showing to the Poona Govt. certain letters sent to him by Baroda Govt., Fattesingrāo asks the Shāstri to send his advice about reduction in expenses and the issue of new loans, farms etc. in view of the probable loss of the Ahmedābād farm.

The letter was received at Poona on 9-8-1814.

50] [Rcd 18-7-1814

पेाा छ २९ रजब सन खमस अशर मयातेन
मुाा पुणे श्रावण शुाा १ इंदुवार.

श्री

विज्ञापना. बातमीदार दोन तीन आसामी कडोन एक सारखे ऐकण्यांत आले ते रीसीडेंट सोासही श्रुत केले. त्याजवरोन साहेब बोलले की, हे वर्तमान खरे असेल परंतु या कृतीचे फल उत्तम होणार नाहीं. मुंबई सरकार आम्हांस पुसतील ते समई याचे आचार पेाा हाफीसजीचे प्रकर्ण येकच समजावील्यावर यांजला समजेल.

१ जसे हाफीसजीनी सरकारी कागदपत्र दस्ताऐवजी बंगाल गवरनर यांस समजावण्याकरितां सिध केले होते त्याप्रेाा मुंबईचे कोडतातील साहेब (फाटलेले)...भाचा व हाजी (फाटलेले) त्याणी समाजाऊन कोडतवाल्याची खातरजमा केली. त्याणी गवरनर साहेब यांस समजाऊन आश्वासन यांजला दिल्हे आहे कीं, तुम्ही काळजी करू नये. तुमचे दिवाणगीरीवीसी दस्ताऐवज वगेर मुस्तकीम आहेत त्यापेक्षा आम्हीं कुमक करू याप्रेाा उत्तरे येथे आली. यावरोन येथोन याणी आपले देवढीवर सिदी मश्रुदा म्हणोन होता त्याजला मुंबईस पाठविला आहे व गवरनर याचेही मनांत याचा मार ठसला आहे. काय प्रत्ययास येते पाहावे.

१ पुण्यास बंधुजीचे वीाा श्रीमंतासी बोलणे चालु आहे. त्यामुळें गंगाधरशास्त्री याचे बोलणे पेश न पडले. श्रीमंतानी आश्वासन दिल्हे आहे. (फाटलेले) तुम्हीं इंग्रजाकडील संधान करोन कामात दाखल व्हावे. मग पाहून घेऊ याप्रेाा पेशवेसेााचे उत्तर आले आहे व हाली साहा दिवसाचे वायद्यानें कासी (द) जोडा पुण्यास राा झाली आहे.

१ बंधूजींनी हुंडी पुण्याहून च्यार हजार रूपयाची याजवर लीहून दयाराम आत्माराम याचे दुकानावर दिल्ही. ती येथे आली त्याचा ऐवज लौकर न पटे. दयाराम याचे दुकानवाल्यासी बोलणे पडले कीं आमचे नांवे लिहून हुंडी सकारावी. ते त्याणी मान्य न केले तेव्हां भाट्यागावाबा दुलभ खुशाल, हरजिवन पिंताबर व गोरेगावकर मिळोन कोटे ऐवजाचे करावयाचे त्यातुन ऐवज देऊं, असे वायदे पांच च्यार दिवस केले. कोटे सिध न झाले तेव्हां चिरंजीवाचे हातचे तोडे व कांहीं कापड वीकून हुंडीचा ऐवज पटवावयाचा बेत जाला आहे.

सदरहु (फाटलेले) लिहीली आहे पुढेही समजेल ती सेवेसी लीहू. सारांश तुर्त तेथील साहेबाची मर्जी सुप्रसन्न राखुन येण्याचा बेत घडावा. मोर्धाकडील आलीकडे रोजनीशीत कांहीं संधान दिसत नाहीं हा संशय येत आहे. तूर्त त्याचेही कार्याकारण संधान सीष्टच्यार असावा. सूचनार्थ लीा आहे. तिकडील वगैरे मनस्वी बातम्या ऐकून चीत्तास येक क्षण चेन नाही. ते पत्रीं काय लीहू ? असो चरणदर्शण होईल तो सुदीन. युक्तीस आल्यास मुले माणसाची रा मुंबईकडे केल्यास ठीक. मग प्रजन्य वगैरे सोय पाहून घडावे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

50]

Letter received on 18-7-1814 by Gangādhar Shāstri at Poona from an unspecified person in Baroda. The writer says that Sitārām Rāoji is trying to secure his restoration to ministership with the help of Hafiz, who has won the sympathy of the Governor of Bombay to his cause. The Resident told the writer that this intrigue will not bear the fruit desired (by Sitārām). The writer adds that

hundi for Rs. 4,000/- sent from Poona by Govind Vishwanāth was dishonoured in Baroda. The writer feels disappointed with the turn, affairs are taking at Poona and advises the Shāstri to leave that place with Elphinstone's permission, and suggests that the children etc. should be sent to Bombay if deemed advisable.

---

51] [30-7-1814

पो श्रावण वा १० गुरुवार सा १८७०

श्री.

रोजनीसी छ १२ साबान श्रावण शु। १३ मंगलवार. सन खमस आशर मयातेन व अल्फ. अजम हनराबल ईलफीष्टी सो घोडनदीचे कापात गेले होते तेथुन रोज मु॥ आले सा अज आम्हीं व बापु ऐसे भेटीस मागील सहा घटका दिवसास गेलो होते. दस्तुर माफत मुलाखात होऊन थोरले बंगल्यांत सो व कारोस सो व आम्हीं व बापु ऐसे बसोन खेर आफीयत परस्परे जाली. यावर घोडनदीस जाण्याचे कारण काय हें विचारले. तेव्हां सहजी गेलो होतो ऐसे बोलले. आम्हीं वीचारले "सहजी कां जाणें असते" ? तर श्रीमंताची स्वारी आली तेंव्हां आपण जरूर येते. स्वारीचे संधीस न आल्यामुळे आम्हास कामाचा कांहीं आर्थ आसेल म्हणोन वाटतो" याप्रो बोलणें झाल्यावर राजश्री सदाशिवपंत भाऊकडे राजश्री बापु छ २६ व छ २७ रजबी व छ २ मानहुस जाऊन बोलणे जाले. तो नार सांगीतला. तो ऐकून म्हणाले कीं या बोलण्यांनीं रस्ता साफ जालासा वाटतो" "पुढे भाऊकडील छ ९ रोजीं निरोप आला कीं तुम्हीं यावे म्हणजे देशमुखास बोलाऊन बोलणे करितां येईल. परंतु त्याचे

ऊत्तर सांगून पो। कीं, देखमुखासी बोलता येइल परंतु त्यांचें आमचे बोलणें तपासण्यास तीऱ्हाईतपणा आपण किंवा श्रीमंत हे सांगावे, म्हणजे ठीक. ते न होयें तर मध्यस्त यास बोलवावे म्हणजे आम्हीं बोलु. चिंता नाहीं. हे न होता आम्हीं येऊन बोलो तर देखमुखाचे बोलण्यास आपण सर्व स्कार देऊन देऊन आमचे बोलणे उडले जाईल हाच दाखला होईल. म्हणोन तीऱ्हाईत आसावा ऐसे सांगून पो" हा मजकूर सांगीतला तेव्हां म्हणाले "देशमुखासी रूबरू बोलण्यास चिंता नाहीं. त्याविना भाग उठणार नाहीं" आम्हीं यावीसी शंका घेतल्या. त्यास बोलण्यांत बाध नाहीं ऐसे संमत पडलेवर बडोद्याहून कनेक सोचे पत्र आले कीं काय ?" म्हणोन विचारीले. "मुंबईस आले, येईल" हतकेच बोललेवर सो म्हणाले कीं "कर्नेक सो शादी करनार असे आम्हीं ऐकतो." आम्हीं उत्तर केले कीं "मजला खबर नाहीं. परंतु इकडे करतील असे वाटत नाहीं. विलायतेस जाऊन करतील" याप्रो बोलणे जाल्यावर श्रीमंताकडे उद्या परवा बैठक होणार आहे असे साहेबी सांगीतल्यावर आमदाबाद प्रकर्णी त्रिंबकजीकडील मार समजाविला. तेव्हां म्हणाले सपासावे आणि मला कलवावे असे सांगीतले. याप्रो बोलावे जाले. नंतर निरोप घेऊन सायंकाली वाड्यांत आलो.........कलम

51]

Copy of Gangādhar Shāstri's diary :—Elphinstone had been to the Ghodnadi camp recently but did not give out to the Shāstri a satisfactory reason for this visit. The Shāstri reported to him the talk between Sadāshiv Bhāu Mankeshwar and Bāpu Mairāl and later the proposal of Mankeshwar to invite Deshmukh for a discussion with the Shāstri and himself. Reference to the report of Carnac's

intended marriage was made by Elphinstone. The Shāstri acquainted Elphinstone with the latest moves of Trimbakji about the farm of Ahmedābād.

---

.52] [8-8-1814

पो छ ६ रमजान भाद्रपद अधिक
श्रा ७ सन खमस अशर मयातेन व
अलफ मुा पुणें.

श्री.

राजश्री गंगाधर कृष्ण मुतालीक गोसावी यांस

अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो फत्तेसिंगराव गायेकवाड दंडवत विनंती, उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लीहीत जावे. विशेष आजम कर्नेक साहेब रीसीदीट निा कंपनी इंग्रेज बहादर हे येथे येऊन यांचे आमचे बोलणे जाले त्यातील विच्यार मिलोन ताा आमदाबाद भाग निा राजश्री पंतप्रधान याजकडील मामलत गेल्यास साडेच्यार लाख रुा कमी पडतील तेव्हां याज बाा खर्च कमी केला पाहिजे त्यास आम्हीं उत्तर सांगीतले की जो खर्च आहे तो सर्व तुमचे ध्यानातच आहे. सरकार हुकमत ठेऊन जो खर्च कमी करावयाचा आसेल तो फोज काईम राहून करावा. त्याज़वरून तुमची सला या गोष्टीस पाहीजे तर खर्च कमी करावयाचा व जमा जाजती करावयाचा हे सर्व तुम्हांस माहीत आहे तरी याचे कसे करावे हे लेहुन पाठवावे. रा छ २१ माहे साबान सुा. आशेर मयातेन व अलफ, बहुत काय लीहीणे लोभ कीजे हे विनंती.

52]

Fattesingrâo writes from Baroda on 8-8-1814 to Gangâdhar Shāstri, Poona, informing him of his interview with Carnac regarding the loss of the farm of Ahmedābād and the consequent cut in expenditure. The writer asks the Shāstri's advice in this matter.

---

53] [10-8-1814

पो छ ६ रमजान भाद्रपद अधिक
श्रुा ७ इंदुवासर सन खमस अशर
मयातेन व अलफ. मुा पुणे.

श्री.

वडीलाचे सेवेसी आपत्ये येसोबा व बाबाने दोनी कर जोडून सीर साा नमस्कार विज्ञापना. ताा श्रावण वाा ९ सोम्यवासर पर्यंत वडीलांचे आशिर्वादे करून यथास्थित असे. विशेष आज प्रातःकाली दरबारास गेलो होतो, श्रीमंताचे दर्शन जाहले. रात्रौ गोकुलआष्टमी जन्मकालसमई कीर्तनास स्वारी गेल्याचे उजागऱ्यामुले श्नान जाले नवते. साा कागदपत्र जाहले नाहीत. श्रीमंतांनीं पत्र आपल्यास लिहीले ते खुलेच पाठविले आहे. त्याचे उत्तर लवकर यावे. अजम रीसीदिंट साहेब, "खर्च कमी अगर जमा कोणे रीतीनें जाजती साधेल ते ठिकाण दाखवावे व आपकारींचे म्हणतो हे कबूल करावे. हे कबूल न केल्यास धणी निरालेच आहेत; त्याचे हुकुमाने आम्हीं कर्णे ते करू सकतो." असी कितेक प्रकारे बोलणे बोलले. त्याची उत्तरे श्रीमंतांनीं पहिलीच दिल्ही होती जे, "हे गरम होऊन निकड करतील तरी मला दरकार नाहीं, जे होणे ते सोईने शास्त्रीबावाचे सलेने घडेल. केवल उतावलीने नवीन

बाबती ठरत नाहीत, मी कबूल कर्णार नाहीं. तुम्हांस कर्णे ते सुखेनें करावे. आमची नेमणुक कमी कर्णे तरी करावी परंतु मी...च्यार लक्ष तीसाची फौज कमी करूं अथवा नवीन बाबती रयतीवर बसऊ हे हरवक्त निकड करतील ती कबूल करू, हा धनीपणा नको." त्याची ही बोलणी या प्रकारची; तीही युक्तीनें आज साहेबास समजावीली आणि सांगितले जे सोयीनें सर्व घडता घडता घडेल, निकडीने बिघडेल. तसें येवीसी श्रीमंताची मर्जी प्रसन्न राहणार नाहीं मर्जी बीघडू नये हे वारंवार दाजी आम्हांस लिहीतात. आजवर बोलीले जे "आमची मर्जी बिघडावी?" तेव्हां सांगितले जे, "आपण खावंद आहेत, आम्हीं हुकुमाप्रो काम करावे परंतु अर्जही कर्णे प्राप्त. आपली मर्जी बिघडणे राखणे हे अर्थ नाहींत." असो. हे बोलण्याचे पर्याय विशेष पत्रीं काय लिहू? यास्तवया बाबेत श्रीमंतास व अजम साहेबास आपली पत्रें यावी त्याप्रो घडेल. "सारांष तुर्त वर्ष सहा महिने खर्च कमी अथवा जमा वाढीवने यावी साहेबी जलदी न केल्यास ठीक, सोयीनें बोलणी बोलुन वडीलाची स्वारी आल्यावर सर्व घडेल," असा भाव साहेबास लिहीला तरी ठीक. मग ध्यानांत येईल ते खरें. दुसरे कोंस्याचे वगेरे वीसीचे जबाब निखालस यावे म्हणजे त्या सुताने चालणे ठीक पडेल. बारावकर रणदिवे व ढमढेरे सात आसामीचे सोयीवीसी श्रीमंताचे आज्ञेवरोन पेशजी आपणास लिहीले होते. हाली पुन्हा यांवीसी आपणास लिहून सला आणवावी म्हणोन श्रीमंताची आज्ञा जाहाली. यावरोन रा॥ बाबाजीपंत बाबानी लिहीले आहे व आम्हीं लिो त्यास यावीसी आज्ञोत्तर यावे त्याप्रो श्रीमंतास विदित करूं. चिरंजीव सो॥ वहिणाबाईस आज पुन्हा मोजें कानवे येथे कल्याणदास साधु याचे दर्शनास पाठवीली आहे. उद्या एकादशीस दर्शन घेऊन येतील. तसी अलीकडे प्रकृतही पहिल्यापेक्षा बरी आहे. श्रुत व्हावे हे विज्ञापना.

53]

Letter from Godbole and Marāthe to Gangādhar Shāstri reporting their visit to Fattesingrāo who

could not attend to office work due to last night's vigil on account of Gokul Āsthami celebrations. The writers state that the Resident asked them to propose reduction under the heads of state expenditure or increase under those of income, failing which he said he would take orders from his masters. Fattesingrāo resented this threat and objected to the Resident's hurrying up such matters. The writers thus are incurring the displeasure of both the parties and request the Shāstri to write a conciliatory letter to the Resident. They beg the Shāstri's instructions about loans from the State bankers and about facilities to seven Marātha gentlemen. The letter is concluded with a line about the improving health of Bahinābāi, daughter of Vitthalrāo Devāji.

---

54] [13-8-1814

पे। ५ ९ श्रावण शु॥ ११ संन खमस अशर

नकल

बातमी

प्रा बडोदें श्रावण वा॥ १३ संवत १८७०.

श्री.

यादी श्रीमंताची स्वारी आलेघर प्रयत्नास लागले आहेत. राजश्री मोदीकडे वगेरे नीत्य रात्रीस जात असतात. तेव्हां परवाचे बैठकींत "तुम्ही येकटाने बेटात जाऊन इंग्रजासी बोलावे" म्हणोन मोदीने सांगीतले, त्याज-

वरोन त्याची याची बहुत बोलणीं जाली. शास्त्री यासी बोलणेचा फड घालावा म्हणतात. त्याजवरून गोविंदराव यांहीं सांगितलें कीं "आम्ही आजपर्यंत कोणते रीतीने फीरतो याचा बंदोबस्त होऊन मोकले हींडु लागलो म्हणजे आम्हीं शास्त्री वगेरे यासी बोलतों, आम्ही त्यास भीत नाहीं." त्याजवरून आज उद्या श्रीमंताचे कानावर घालुन बंदोबस्त करीतो म्हणोन खातरजमा केली आहे. दुसरे वर्तमान त्रिंबकजी डेंगले याजकडे आमदाबादचे सुभेचे प्रकर्ण नेमीले आहे त्यास आपले कडील पागा तेनातीस चाकरीस म्हणोन नेमुन घेणार. येवीसी तुम्हाकडे दोनचार रोजा बोलणे येईल. यात मुखताप आहे परंतु पागा हातास येत नाहीं. गायकवाड याचे हुजुर पागा दोनतीन आहेत. हे चाकरी नेमली आहे. बरोबर जाण्याचे म्हणोन बहुताप्रकारे आपली खातरजमा करून गोडीनेच नेणार परंतु आतील मसलत वेगली पडती याची हुशारी राखावी. आपण म्हणतील हे गोष्ट आवईची परंतु नाहीं. पुढे दाखलेस येईल. पकेपणे वर्तमान समजोन लीहीले आहे.

सदरहु बातमी गोविंदराव विश्वनाथ याजकडील.

54]

Copy of an informant's report to Gangādhar Shāstri. It says :—"Govindrāo Bandhuji has been busy since the Peshwa's arrival. He sees Modi every night. Modi advised him to speak to the Resident. Govindrāo expressed his defiance of you (Shāstri). Dengle is appointed subha of Ahmedābād and he wants troops posted there under him. Beware of his plans."

55] [About September 1814

श्री.

२. पुरवणी वडीलांचे सेवेसी विज्ञापना

शांक सो व वार्डीन सो वगेरे आपले जिवलग दोस्त मुंबईस आहेत त्यांत कोसलचे सोही आपले रिसीदेटसीचे कामावर खुष आहेत असे त्याचे उद्‌गार अजम उईलम सोनी लिो आहेत. वरकड पारसी याणी पुण्यासही मोदीस लिहून अमदाबादचे कामास हीसका मारला हे निश्चय जाले. असो. कृतकर्माचे फल पावतील. सो आणखी आपल्यास त्याहावयासाठीं बोललें कीं, "आपण सदरहु गोष्टीवर दिलगीर होऊं नये. मुंबईस जो जाब तुमचे-वीसी पडेल तो मी देईन. शेवटी मी या बाा॰तुमचा साथी आहे." इत्यादीक खातरजमेचे बहुत फरमावीले. सारांष हे प्रकर्ण मास पक्ष होत आला ऐकीतो आणि चालु आहे. परंतु आज इतके दिवसांत अजम रिसिदिंट साहेबाची निखालस बोलणी जाली. आतां संशय राहीला नाहीं. वडीली तीलमात्र कालजी करू नये. गवरनर साहेब ही बहुत आदेशाचे आहेत. ऐकून घेतात तसे मुद्दाशिवाय निकडीने त्याहावे, जबाब पुसावे असे नाहीं. तसा आपलेकडे मुदाही कोणता लागणार ! जे कर्णे ते सरकार कंपणीत जाहीर करून सत्याने केले आहे. त्यापेक्षा त्याची कालजीही नाहीं. सितारामबाबा-कडील सांगण्यावर त्याजकडील वकीलानी व पारशानी शुलक वाकडेपणाची बोलण्याचा पार राखलाच नाही. परिणामी फाजित होतील. परंतु सध्या मनस्वी भाषणे मुंबाईस बोलतात. असो. सारांष आपला व्यवहार साफ आणि अजम रिसिडेंट साहेब यांचा खंबीर त्यापेक्षा श्री सांब कृपेन सर्व पार पडेल. चिंता नाहीं. चिरंचीव सो बहिणाबाईची प्रकृत बरी आहे. दरबारास आज च्यार वाजतां जातो. तीन च्यार दिवस पत्र येत नाहीं तेणेकरोन कालजी लागली आहे. प्रकृत बीघडली आहे त्याजमुले सुखरुपतेचें पत्र नित्यशा येत गेले असता चितास संतोष राहील. सिताराम रावजीकडील चोकी

उठणे ती आतां मुंबईचे हकुमाशिवाय घडणे कलतच आहे. बहुत काय लिहीणे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

55]

Last folio of a letter prodably from Marāthe or Godbole to Gangādhar Shāstri *(Poona).* The writer says that Mr. Williams has expressed his view that the members of the Council are pleased with the Shāstri's work at the Residency; that the Pārsee friends of Sitārām have spoiled the Giākwād's interests at Ahmedābād by writing to Kharsedji Modi of Poona; and that the Resident has asked the writer to advise the Shāstri not to worry over this as the Resident will give him his support. The writer believes that the Governor will act like a far-sighted statesman though Sitārām's partisans in Bombay are *indulging in* wild talk. He adds that Sitārām's residence is under guard and will remain so till orders from the Bombay Governor are reached.

---

56] [27-9-1814

पो आश्वीन श्रुा २ संवत १८७० नकल.

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सन खमस असर मयातेन व आलफ छ १२ सवाल भाद्रपद श्रुा १३ मंगलवार मागील साहा घटीका दिवस राहाता आम्हीं व बापु येसे बंगल्यांस गेलो. दस्तुर माफक मुलाकात जाल्यावर

थोरले बंगल्यांत साहेब व करोस सो व पाटीन सो व आम्हीं व बापु येसे पाचजण बसोन परस्परे कुशल प्रश्न जालेवर मागील दालनांत जाऊन बसोन बोलणे जाले...........................कलम

१. बडोद्यास पत्रे धरली त्याचे रपोट आले त्याचा पर्याय पुसला तो सांगीतला. तेव्हां साहेब म्हणाले, "तसदी सिताराम यास होईलसे वाटते" .........कलम

२. सितारामबाबा याचा कारभार मना व्हावा याचे कारण व हफेस गुलाम प्रकर्ण पुसलेवरोन सांगीतले कीं, "जमाखर्च बरोबर करा येसे साह महीने कंपणी म्हणत असता न केले. जमेपेक्षा दाहा लक्ष खर्च जाजती दर साल तेव्हां कर्ज कसे मीटते ? दुसरे कारण घरी कारभार करीतां, हा करू नये सरकारवाड्यांत करावा. ह्या दोनी गोष्टी सांगत असता न येकीले. खर्च कमी होत नाहीं व सरकारवाड्यात कारभारास जाणार नाहीं ऐसे बोलणे पडले. तेव्हां बाबाजी, रावजी आप्पाजीचे बंधु, यांस आणोन त्याचे हातुन सारे बंदोबस्त खर्च कमी करण्याचे व सरकारवाड्यात काम करण्याचा सीलसीला चालु केला. ते काली दायते चालत होते. पुढे हफीस प्रकर्णे त्यास धरले. त्या जवल कागदपत्र सिंदवाले वगैरे सरदारासी सिलसिला करोन त्यासी मदार ठरऊन घेऊन येऊन कंपणीस सनद द्यावी या भावाची पत्रें सितारामबाबाचे नांवेची सापडली. त्यांत गायकवाडाचे संमत अगर त्यास कलवुन अगर त्याचा दस्ता ऐवज कांहीं येक नसता सितारामबाबानी स्वबुद्धीने केले ऐसे मुक्रर जाल्यावर हेफस केद केला व दायते बंद केले." तेव्हां सो म्हणाले कीं, "याजवरोन ऐसे दिसते गायकवाडाचे दौलतीचा अभिलाष धरोन हे कृत्य आरंभीले. तेव्हां ऐसेच फल मुक्रर होईल यांत आंदेशा नाहीं."..........
कलम

३. "मुंबईस पनास लाखाचा तुम्हीं बोलला तो मजकुर ली. त्याचा जाब आला कीं आम्हांस याविसी बहुत आंदेशा आहे कीं, फेसला

कसा होईल ? त्यास तुमचे बुद्धीस येऊन द्याल ते खरे ऐसे ज्ञात्र आला," म्हणोन साहेबांनीं सांगीतले.......... कलम

४. श्रीमंताची स्वारी जाईल कींवा नाहीं हें मुकर नाहीं. परंतु गणपती उत्साह जाल्यावर लौकरच येक दोन दिवसांत बैठक श्रीमंताची होईल. ते प्रसंगांत ब्रेंजी (?) बीसी ब्रोलावयाचे व दौलतीचा अहवाल सांगावयाचा. त्याबीसी आंदेशा वाटतो कीं श्रीमंताचे दिलात ऐसे येईल कीं, बंधूजीस काढून देणेबीसी बोलतात. कारण ते वाकफगार ते गेले असतां हे समजावणार. ते असल्यानी खरे खोटे बंधूजीनी सांगले यास्तव प्रथम हा मुद्दा घालतात येवढी शंका वाटते. तेव्हां ब्रोलावयाचा वीचार ठरला कीं, दौलतीचा जमाखर्च कर्ज मुखे करोन ब्रोलोन समजवावे. यादी दाखऊ नये. नंतर ब्रोलावे कीं, "आम्हीं सांगतो हे बंधूजीसही पुसावे. ते समजावीतील. त्यात फरक असल्यास ध्यानास येईल. कारण बडोद्यात सितारामबावानी बखेडा केला त्याबीसी बंदोबस्त होत आहे. त्यामुळे बडोदेकरबीसी थेट बंधूजीस मागण्याबीसी लीहीतील. तेव्हां आम्हांस आपले जवल मागून घेणें जरूर आहे. आपण देतील हा भरवसा आहे." ऐसे ब्रोलण्याचा मदार ठरावा...............कलम.

येणेप्रा बोलणे होऊन तीन घटीका रात्री लष्करांत आलो.

56]

Copy of Gangādhar Shāstri's diary for 27-9-14. He saw Elphinstone as usual and told him the report of letters intercepted at Baroda. To Elphinstone's question, the Shāstri replied that Sitārām did not adjust the accounts though warned by the Company, incurred a debt of Rs. 10 lakhs and refused to transact office work in the Government Office.

Later on, the Shāstri continued, Sitārām was detected involved in a conspiracy with Hafiz. The Shāstri hopes to interview the Peshwa soon after the Ganpati festival and then to convince the Peshwa by oral proof of the false nature of the accounts given by Bandhuji and to request the Peshwa that he may agree to hand over Bandhuji if and when required by Baroda Govt. in connection with the affairs of Sitārām.

---

57] [28-9-1814

पो आश्वीन शुा २ संवत १८७०. नकल.

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सन खमस अशर मयातेन व अलफ छ १३ रोज बुधवार माहे सवाल भाद्रपद शुा १४ मागील चार घटीका दिवस राहाता आम्हीं व बापु ऐसे बंगल्यास साहेबाकडे गेलो. मुलाकात दस्तुर माफक जाल्यावर सरकारचा गणपती संगमावर बोळवावयास आला. त्यासमागमे श्रीमंत स्वारीसह आले. तो समारंभ पहाण्यास संगमावर बंगला आहे तेथें साहेब व आम्हीं जाऊन बसोन समारंभ पाहीला. गणपती बोळऊन स्वारी माघार गेलीयावर उठोन थोरले बंगल्याचे दालनांत येऊन साहेब व करोस साहेब व आम्ही व बापु ऐसे असोन बोलणे जाले...कलम

१. बडोद्याहून पत्रें आली. सितारामबावा प्रकर्णीं श्रीमंत बाबासाहेब पत्रे लीा त्याचा जाब साहेबी लीहीला. तो मार व सितारामबावाकडे सरकारातून प्रबुध मातबर सहाजण पो. बोलणे जाले. पुढे तसदीचा मार तो समजावीला........कलम

२. साहेब म्हणाले कीं, "हे चांगलें जाले." परंतु रावीसन सोा बोलले कीं "मुमईस तुम्हीं सीलसीला चालु ठेवावा त्यावीसी चिंता नाहीं. परंतु पुण्यांचा मना करावा यात फार नुकसान गायकवाड सरकारचे होतें, हे बोलणे ठीक नाहीं. कारण पेशवे सोास समजल्यावर ते आपले मनात वाईट मानुन पक्ष त्याचा धरतील. त्यास सरकारसंमता-खेरीज हरयेक जागा बोलणे सीलसीला ठेवणे हे बेआदबीची चाल असे. बोलण्यांत अर्थ एकच होतो परंतु दुसरेयास दिलगीरी होऊन पावत नाहीं हे बोलणेत मला बरे वाटते." त्याचा जाब आम्हीं दिल्हा कीं, "इतके कोण सांगणार?" तेव्हां साहेब बोलले कीं, "यावीसी शंका नाहीं. एकाची चार समजाऊन उत्तेजन देतील यात आलस करणार नाहींत......" कलम

३. आम्हीं साहेबास सांगीतले कीं मोठी आकलमंदीचे काम बाबासो केलें कीं सहाजण पाठऊन बोलवीले. त्याचा जाब साहेबी दिल्हा कीं मुखत्यारी हुकुम फतेसिंगराव याचे हातात त्यास खलेल करू शकतात. त्याचा बंदोबस्त केला तो करणे लाजमच आहे......कलम

४. दादासोाचे चालीचे दिल शाबुत नाहीं. त्यावीसी पुसले. त्याचें उत्तर सांगीतले कीं "हरएक समई दिलाची शाबुती राहात नाहीं म्हणोन दादासोानीच मुखत्यारपणा बाबासोास सांगुन बंदोबस्त केला." हा मार सांगीला......कलम

५. आम्हीं सोास विचारले कीं, "ही खबर पेशवेसोास कलेल तेव्हां बहुत गरम होतील आणि आम्हांवर तसदी करू सकतील. आपण श्रीमंतासी बोलणार त्या समयात हे गोष्ट धोकाची दिसती." त्याचे उत्तर साहेबी केले कीं, "बरे जाले. पुढेतरी हे घडोन मर्जी गरम होणार ते आताच जाल्यास चिंता नाहीं. आम्हीं कांहीं दिवस बोलणार नाहीं. गरमी मीटल्यावर बोलता येईल." यावीसी जाब पडला कीं,

"फत्तेसिंगराव याजकडे मुखत्यारी आहे त्यास हे खलेल करावयास च्याहतात. याचा मुद्दा हाती लागल्यामुळे त्याजला चंदांत (?) करणें लाजम आहे, वाकडे नाहीं ऐसे बोलता येईल"......कलम

६. सितारामबापूचा वकील मुसलमान मुंमईस आहे त्याचे पत्रांत "वकार-पूर्वक" ऐसे लीा त्यास वर्डीनसोाची शंका ते मला वाटत नाहीं कारण वर्डीन सोा बहुत साफ मातबरीचा इरादा आहे. आणि वाकफ-गार आहेत. त्याजकडोन ऐसे घडण्याचे नाहीं. हे माझी खातरजमा आहे......कलम.

७. आज गणपती गेला. उद्या आगर परवा आमचे बैठकीचे मुकरर होईल त्या बैठकीत बोलणे होईल व स्वारी जाते कीं नाहीं हे कलेल. ते मार कलउ.......कलम.

सदरहू प्रो बोलणे होऊन दोन घटीका रात्रीं लष्करांत आलो.

57]

Copy of Gangādhar Shāstri's diary for 28-9-1814. The Shāstri and Bāpu Mairāḷ visited Elphinstone's bungalow before sunset. The Peshwa had come in procession to the Sangam (confluence of the rivers) at Poona to immerse the Ganpati images. The Shāstri acquainted Elphinstone with the contents of Fattesingrāo's letters about Sitārām to the Resident and of the replies to them and referred to the deputation of six burghers sent to Sitarām by Fattesingrāo. Remarks on this account were passed by Robinson, Elphinstone and the writer. A reference to the weakness of mind seen in Mahārāja Ānandrāo was made in passing and again the subject of Sitārām

was taken up. The Peshwa's probable resentment for Sitarām's confinement was discussed. The Shāstri considered that the reference to "W......" in Sitārām's Bombay papers cannot connote "Warden" as Warden is a man of character and integrity.

---

58] [10-10-1814

पो आश्वीन श्रा ८ शंवत १८७०. नकल.

श्री

रोजनिशी स्वारी पुणे सुमा खमस आशर मयातेन व अलफ छ २५ शवाल भाद्रपद वा १२ सोमवार मागील च्यार घटका दिवस राहाता आम्हीं व बापु बंगल्यास गेलो साहेबाची मुलाकात दस्तुर माफक जाली. यावर थोरले बंगल्यात साहेब व करोस सो व रसल सो व पातनल सो व आम्हीं उभयता बसोन परस्परे खुषींचे प्रश्न जाल्यावर बोलणे जाले.....
कलम

१. आहीं ऐकीले वर्तमान वगैरे सांगीतले त्याजवरुन बोलणे जाले... कलम

१. श्रीमंताची स्वारी फुलगांव आपटीस जाण्याचेपूर्वी गोविंदराव काले यास

बारामतीस पत्र पो कीं तुम्हीं तेथे यावे. भेट होऊन बोलणे बोलुं. यांवरून ते फुलगांवी आले. भेटलेवर येकांती श्रीमंतांनीं त्यास सला विचारली. त्यानें उत्तर केले...कलम

१. "सदासिवपंतभाऊ दोन वर्षामागे आमचे लक्षांत वागत होते. आमचा लोभही तसा होता. हाली ते इंग्रजाचे हीमायतीचे लक्ष धरतात यावरून आमचा आलोभ जाला." त्याचे उत्तर त्यानी केले कीं, "हे गोष्टी

गोष्ट नाहीं. खावंदगीरी स्वामीकडेच राहातील तसे करतील. त्यास हीमायत कोणाची होऊ सकणार नाहीं."...कलम.

२. "आलीकडे हरयेक कामांत इंग्रज आग्रह धरतात हे वाईट वाटतें." त्याचे उत्तर त्याणी केले कीं, "हे मनांत ज्या कालीं सारे दौलतदार मजबुत होते त्या कालचे विचार. आतां कोणांत मजबुदी अगर येकदिली नाहीं. तसे सरकारानी त्याजला लक्षी ठेवीले नाहीं. आतां साहास केला तर गोष्ट घडणार नाहीं. ते पक्षी याच्या विश्वासावर जो क्रम चालला हाच चांगला. इतर विचार करणे यांत सुखावह नाहीं."...कलम

३. "गंगाधर शास्त्री आले ते आमचे लक्षीचे पूर्वी असून हाली लक्ष कांहींच नाही. इंग्रजच जाले." तेव्हां त्याणी उत्तर केले कीं, "ज्याची चाकरी करणे त्याचे लक्षाणी वागणे हा सदगुण मोठा. याविसी दोष त्याजकडे नाहीं." सदरहुप्रा बोलणे जालीयावर काले यांस निरोप दिल्हा. नंतर स्वारी येथें आली. काले येथे येऊन पक्ष करून परवा बारामतीस गेले....कलम

तेव्हां सो म्हणाले कीं, "श्रीमंत हुशार आहेत. हरकोणास सला विचारणेची दरकार काय ?" आम्हीं सांगीतले कीं "काले बुजरूग आकलवंद म्हणून विचारले. तसे त्याणी तेच सला सांगीतली."...कलम

१. हिंदुराव घाटगे येथून जांबगांवाकडे गेले कारण काय ? तेव्हां सो म्हणाले "जाणार असे ऐकीले होते. गेले ही खबर मला नाहीं."... कलम

१. सिंद्याकडील पलटणे भुपालावर आली असे ऐकतो. तेव्हां म्हणाले "माघारे गेली."...कलम

१. होलकर याजकडील फौज तोफखाना थालनेरास आली. तेव्हां म्हणाले "बंडाकरीतां आली होती ते गेली असे ऐकतो."...कलम

१. पेंढारी सतसाचा घाट उतरले असे ऐकतो. तेव्हां बोलले "हे खरे आहे परंतु गुजराथचा त्यांचा इरादा आहे कीं काय ?" आम्हीं सांगीतले "हे ऐकीले नाहीं. कदापी आल्यास तेथे सरंजाम हुशार आहे. चिंता नाही...कलम

१. श्रीमंताची स्वारी कार्तीकस्वामीस जाणार हें खचीत. तयारी मुकाम मुकामचे महत्ते ठरोन राहतेकर यांस ऐवज दिला. तेव्हां म्हणाले "हे पहीलेच बोलले जातील ऐसेच आहे."...कलम

१. श्रीमंताची स्वारी जाणार म्हणोन श्रीमंतांनीं मनांत विचार आपले संतोषाकरितां केला आहे कीं, आमचे काम मोठा फेसला आपले रूबरू ठरावांत आणावा व आमदाबादचे काम खानगी माणसाचे नांवे करून आपले संमतानी व वहीवाट इकडेस सांगावी. माहुलीस जाता श्रीमंत व भाऊ बसोन याची घरगुती आमचे प्रकर्णी केली होती ते याद भाऊजवळ होती. भाऊकडून आणून आपले जवल टेवीली. येक दोन रोजात बैठक आपली खचीत होणार असे ऐकीले ते सांगतो. तेव्हां साहेब म्हणाले, "बैठक पडेल तेव्हां सिताराम प्रकर्णी बोलतीलसे वाटतें. त्याचा जवाब आपले जवळ आहे. देऊ सकतो. तुम्हीं सांगता हा मदार नजरेस आल्यास बरेच आहे. खामोखा हाली पहीले बैठकीत ही गोष्ट आम्हीं बोलणार नाही. दुसरे बैठकीस बोलू. श्रीमंतांनीं काढल्यास मग बोलतच आहो."...कलम

१. त्रिंबकजी डेंगलेकडून, प्रमाणीक ग्रहस्तासमागमे स्नेह असावा परस्परे कामाचे उपयोग घडावे, लक्ष्मणपंतास आम्हांस द्यावा, असे बोलणे आले परंतु मजला विश्वास नाहीं. त्याची चाल नकारी याजवरून त्याचे कसे करावे ? त्याचे उत्तर साहेबी दिल्हे कीं, "तुम्हीं आकलवंद आहा नजरेस चांगले येईल ते करावे"...कलम.

१. साहेबी भुजेकडील पुसले त्यावरोन फतेमहंमद याचीं मुले लेकरे मारली हे वर्तमान सांगीतले. तेव्हां म्हणाले, "मुंबईहून गोरे पलटण जाणार आहे." आम्हीं उत्तर केले करनेल सो जाणार. मसलत होईलसे आहे.....कलम

१. साहेबी विचारीले, "बडोद्याकडील सिताराम रावजी प्रकर्णी नवे कांहीं वर्तमान आहे कीं काय ?" आम्हीं सांगीतले कीं, चोकी आहे तशी आहे. असे असता फीरून पत्रें पार्सी मुंबईहून पो ती धरली गेली व येक षखस मुंबईहून आला तो डंकीन साहेब व वाकर साहेब यांचीं कामे खराब आम्हामुले ऐसी बोलतो. "त्याची चिंता नाहीं. रपोट मागील तपासोन इनसाफ अर्थात दृष्टीस पडेल व सितारामाची चालही उबह होईल. मुंबईत तीघेजण सितारामबावाकडील होते. ते भावनगर सुरत साष्टी तीन ठिकाणी गेले. महिपतराव साष्टीस गेला. त्याची हकीकत द्यावी म्हणून साष्टीस हुकूम गेला आहे....कलम

सदरहु प्रमाणे बोलणे होऊन सायंकाली नीरोप घेऊन वाड्यांत आलो.

58]

Copy of Gangādhar Shāstri's diary for Monday 10-10-1814. Close, Russel and Pottinger were with Elphinstone while Bāpu Mairāl accompanied the Shāstri. The Shāstri imparted the local news he had received to Elphinstone. Govindrāo Kāle, the veteran statesman, was invited from Bārāmati and consulted in private by Bājirāo. The Peshwa expressed to him ( Kāle ) his regret for Sadāshiv Bhāu Manakeshwar's change of fidelity; and for the obduracy of the English. Kāle advised him that in

view of the disunity and weakness of the Marātha Sardars, there was no use opposing the English. The Peshwa complained that Gangādhar Shāstri had turned into an Englishman so far as loyalty was concerned. Kāle exonerated the Shāstri by remarking that he was faithful to his employers. After this Kāle took his leave.

News from Hindurāo Ghātge, Shinde's camp, Holkar's army, the Pendhāris and the Peshwa's camp was then touched upon. Then the Shāstri said to Elphinstone, "I have received news that the Peshwa has decided to solve the Baroda question in a day or two and give the farm of Ahmedābād to some private persone. The Peshwa may hold a conference with you shortly."

Shāstri then referred to Dengle's overtures to him for friendship and informed Elphinstone that Sitārām's house was still under guard, though his agents were free and active in Bombay.

---

59] [18-10-1814

पो आस्वीन वा ७ मंदवार संवत १८७०. नकल.

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सुमा खमस अशर मयातेन व अलफ छ ४ जिल्काद आस्वीन शुा ५ मंगलवार मागील साहा घटीका दिवस राहाता

आम्हीं व बापु मैराल असे गेलो होतो. साहेब तंबूत होते. तेथें मुलाकात दस्तुर माफक होऊन तंबूत साहेब व करोस सो व रसल सो व पांतजल सो व आम्हीं व बापु ऐसे बसोन बोलणे प्रथम परस्परे तबियत खुशीचे जालीयावर बोलणे जाले....कलम.

१ साहेब म्हणाले कीं, "काल आमची बैठक झाली त्यांतील बोलणेची बातमी तुम्हीं काय ऐकीली ते सांगा." आम्हीं उत्तर केले कीं मुफसल. बातमीदारास येऊन सांगावयास फुरसद न जाली सा कलले नाहीं. परंतु प्रथम हेदराबाद प्रकर्णी, नंतर सितारामबावा प्रकर्णी, नतर सावनूर प्रकर्णी खासा श्रीमंतच बोलले. तुम्हीं कांहीं उत्तरे करून श्रीमंताची मर्जी राखून उठला इतके ऐकीले....कलम.

२ आम्हीं ऐकीले यात कांहीं अधिक उणे बराबर नाहीं. आपले ऐकू तेव्हां मजमुन दुरूस्त दिलात येईल. त्याजवरून साहेबी मा श्रीमंताचे बैठकीतील सांगितला....कलम.

१ प्रथम हेदराबाद प्रकर्णी, जाबसालाचे तंटे आहेत त्याकरितां करोस साहेबास तेथें पाठविणेवीसी बोलणे जाले.कलम....

२ सितारामबावानी बखेडा फीतुर केल्यावरून तेथें तसदी खावंदानी केली. त्याजकडील बंधुजी येथे आहेत. त्याजवीसी बोलावयाचे आहे. परंतु बोलवत नाहीं. तेव्हां श्रीमंत बोलले कीं, "गोविंदराव फीतुरी बोलणे बोलत नवता व आम्हांसही खाईश नवती परंतु तेथून गायकवाडची पत्रें व हुजरे आले ते हुकुम चालत नाहीं. बंदी बहुत. इलाज नाही. ऐसे बहुत प्रकारे आडचणी दिलगिरींचे आर्थ सांगून पाठविलें. त्यास या दौलतीचे मालीक आम्हीं व सिताराम कारभारी आमचे तरफेचा, त्यापक्षी ऐकणे बंदोबस्त करणे आम्हांस प्राप्त. त्यास नवे कारभारी याणी गायकवाड व सिताराम यास बंदी केली हे

चांगले नाहीं." त्याचे उत्तर साहेबांनीं केले कीं "फितुर मुद्यानी शाबुत जाला. तेव्हां सिताराम यांस बंदी केली. गायकवाड यांस बंदी नाहीं. हे आमचे रीसिदेंट साहेब लोक पाहातात. हमेशा जातात. गाठ पडती. कारभारी सरकारातून नेमून देणे याचा सिलसिला मागील नाहीं. सालाबादी ऐवज व फौज दोन कलमे मात्र आपले सरकारची ऐकण्यांत व वहीवाटीत याखेरीज कारभाराचा सिलसिला अगर वहिवाट येथील इतल्यानी ऐकण्यांत नाहीं." तेव्हां श्रीमंत म्हणाले कीं "फीतुर केला होता तर गायकवाड व सिताराम यास आणवावे. तपासता येईल." तेव्हां साहेब बोलले कीं, " हे कसे होईल ! जाले असता बडोद्याचा तहनामा खोटा पडेल व वसईचे तहनाम्यास खलेल. याजकरितां ह्या गोष्टी इतःपर बैठकीत बोलो नये हे लाजम"......कलम

२ कार्तिकस्वामिस जाण्याची जीकीर निघाली. परंतु मुकरर कांहीं जाले नाहीं.......कलम

येणेप्रमाणे बोलणे जाले. दुसरी बैठक होणार आहे. त्यांतही असीच मर्जी श्रीमंतांची दिसली तर मला नेक सला दिसती की, तुम्हीं श्रीमंताची स्वारी गेलीयावर बडोद्यास जावे. आम्हीं पुसले, "श्रीमंतांनीं रजा न दिली तर आम्हांस जरूर नाहीं. आपली रजा घेऊन जाऊं." तेव्हां बोलले श्रीमंत मना करणार नाहींत.......कलम.

३ कच्छप्रकर्णी गोष्ट साहेबी काढीली तेव्हां तेथे जाली कृती सांगितली. "फौज जाणार ते युरोपेन आद्याप जाहाजात चढले नाहींत" ऐसे साहेबी सांगितले........कलम.

४ "श्रीमंत बाबासाहेब व कर्णेक साहेबाची तबीयत बिघडली आहे व गुजराथेत आजार फार जाला आहे" ऐसे आम्हीं वर्तमान सांगितले.

...कलम.

येणेप्रमाणे बोलणे होऊन निरोप घेऊन सायंकाली वाड्यांत आलो.

59]

Copy of Diary of Gangādhar Shāstri: Elphinstone had an interview with Bājirāo II on the previous day when the topic of Sitārām and his emissary Bandhuji was opened. Elphinstone contradicted Bajirāo's claim to powers to hear the Gāikwād–Sitārām dispute by saying that the claim was quashed by the treaty of Bassein. Reference was also made to the Hyderābād settlement and the trouble in Cutch.

---

60] [19-10-1814

पो आश्वीन वा। २ संवत १८७०. नकल.

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सुमा खमस आशर मयातेन व अलफ छ ५ जीलकाद आश्वीन शु॥ ६ बुधवार अजम सो॥चा इशारा आलीयावरून मागील च्यार घटका दिवस राहता आम्हीं व बापु ऐसे साहेबाकडे गेलो. तंव्हुत साहेबाची मुलाकात दस्तुर माफक होऊन साहेब व करनेस सो॥ व रसल सो॥ व आम्हीं व बापु ऐसे बसोन परस्परे खुसी प्रश्न जाल्यावर बोलणे जाले......

कलमे

१ साहेब बोलले कीं तुम्हीं बातमीदाराकडील वर्तमान ऐकले असेल ते सांगा. त्याजवर ऐकीले ते सांगितले, श्रीमंताचे व (आमचे) काल खलबत जाले त्यात......वगैरे जाबसालावीसी साहेबासीं बोलोन....कडून बसवावा व भाउंनी सांगितलें मोदीस......याजकरितां त्रिंबकजी डेंगले

यास आज्ञा होऊन मोदी......बोलले तो मजकूर मोदी बोलतो ऐसे कबुल न केले......ऐकीले मोदी बोलले असतील तेव्हां साहेब बोलले......नाही...... कलम

२ श्रीमंताचा आतुन गुप्त सीलसीला आपल्यापासी चालु जाला असे ऐकतो. तेव्हां बोलले कीं नाहीं. परंतु भाव पाहतां...वाटतो.

३ साहेब म्हणाले आनंदराव वकील बेठकीचे बेतावीसी बोलण्यास आले होते. त्यांस आम्हीं सांगीतले रूबरू बोलण्यांत श्रीमंतास खफगी होती असे वाटते. याजकरीतां प्रथम भाऊसी बेठक होऊन बोलणे होईल तो मार श्रीमंतास ते जाहीर करतील मग श्रीमंतासी बेठक कराव याची, उद्या भाऊकडे बेठक जाल्यास पर्वा श्रीमंतासी बेठकीस ठीक... सांगीतले... कलम

४ सीतारामबावाचे दिवाणगीरीचे तहनाम्यांत आर्थ कसे हे पुसल्यावरून प्रथम तहनामा त्यात पुस्तदरपुस्त मराठीत गोपालराव बापुजीनी लीा परंतु इंग्रजीत नाही. अखर तहनाम्यांत मागील तहनाम्याचे सारांस जमेस धरते वेलेस पुस्तदरपुस्तची जिकीर होऊन अखर तहनाम्यांत हा अर्थ काढोन टाकीला तो मजकुर सांगीतला... .. कलम

५ दिवाणगीरी पेशवे सरकारचे इतल्यानी ऐसी चाल आहे कीं काय ? तेव्हां रामचंद्र बसवंत दमाजीराव यांचे कारकीर्दित होते तेथोन आजपर्यंत वहींवाट समजावीली. बहुत दिवाण जाले त्याणी पुण्यास येऊन फेसले केले त्याजला कैदेत खावंदानी घातले परंतु त्याचा वारसा पेशवे सरकारनी केला नाही. तसें फतेसिंगराव यांचे वेलेस अंताजी नागेश व गोविंद गोपाल हे केद केल्यावर सरकारात कलम लीहून दिल्हे. त्यावर मखलासी जाली आहे कीं तुम्हीं आपला वाजवी . फेसला करून घेणे, त्याचा पक्षपात होणार नाहीं. तसे आजपर्यंत कलमबंद्या सरकारच्या

जाल्या त्यांत दिवाणगीरीचा ( अर्थ ! ) कांहीं नाहीं. रावजी अपाजी यांचे विद्यमानेंचे दोन कलमबंद्या त्यांतही आर्थच नाही. खावंद आहेत. मर्जीस येईल त्यास काम सांगतील. अंतर पडेल त्यास सीक्षा करतील. याचा वारसा कोणाचा नाही ऐसीच वहिवट आजपर्यंत चालत आली......
कलम

६ साहेब म्हणाले भाऊकडे बेठक होईल ते समई आम्हीं म्हणू कीं तुम्हीं त्या दोलतीचे मालीक म्हणता त्यास ऐसे कसे घडेल ? दुसरे. तहनाम्याचा मार बंधुजीनी समजाविल्यावरुन आम्हांसी बोलतील तर उत्तर करु कीं गायकवाडासी आमचा तहनामा जाला त्यास पेशवे सरकार बहादर नाहीं. तसे त्याचा आमचा फरक जाला तर आम्हीं सांगणार नाहीं. गायकवाड आम्हीं .......घेऊ तसे दिवाणगीरी खावंदगीरीचे संतोषाचा आहे..........आगर हीमायतीने जाली नाही व व्हावयाची नाही...
कलम

७ फत्तेसिंगराव व गोविंदराव यांचे वेलच्या कलमबंद्याचा तरजमा करुन घ्यावा. करुन घेतो. नंतर आखर तहनाम्यांत कलम पुस्तदरपुस्त काढोन लीहीले ते काफी जवल आहे की काय ? आम्हीं उत्तर केले येथे नाहीं. परंतु मी सांगतो हेच प्रमाण. दाखला मुमईस आहे. आणवावा आगर आम्हीं पंधरा दिवसांत आणवीतो. तेव्हां बोलले आम्हांस आतां जरुर आहे. आवकाश नाही. अखर तहनामा...ल इतल्यानी जाला आहे तर येथे नकल आसल पाहू असे...कलम

सदरहु बोलणे होऊन निरोप घेऊन सायंकाली वाड्यांत आलो.

60]

Copy of Gangādhar Shāstri's diary of 19-10-1814: At Elphinstone's request, the Shāstri told him the latest news received by him from the informants.

(Portion of the letter is torn). Elphinstone asked the Shāstri about the agreements regarding Sitārām's ministership. The Shāstri told him all about the agreements from the beginning and added that the clause about the hereditary ministership was deleted in the last agreement. Elphinstone then asked him if the Peshwa had any hand in the appointment of a Baroda minister to which the Shāstri replied in the negative, quoting precedents of former Ministers like Rāmchandra Baswant, Antāji Nāgesh and Govind Gopāl. Elphinstone thereupon assured the Shāstri that he would ask the Peshwa's Agent to prove how the Peshwa is the overlord master of the Gāikwād State. Elphinstone considered that the Gāikwād was competent to appoint an approved minister. Lastly Elphinstone asked the Shāstri for translations of the Kalambandis of the old regimes and for a copy of last agreement about Ministership in which the word "hereditary" was deleted.

---

61] 21-11-1814

श्री.

चो सकल राजमान्य राजश्री शास्त्रीबावा स्वामीचे सेवेसी

विद्यार्थी कृष्णाजी मल्हार फडके याचा नमस्कार विनंति, येथील कुशल ता कार्तिक शुा ९ पर्यंत जाण. [illegible]

लीहीत असीले पाहिजे. विशेष आपण पेशजी जासुदा वगेरर पत्र पो ते पावले. रा प्रभाकरपंत दाजीस पत्र लिहून देण्याचा मजकूर ली। त्याप्रो दाजीस पत्र लीहून देऊन जासुदाबरोबर रवाना केले. आपल्यास कलावे. यानंतर प्रो भडोच येथील मोजे दयादरेकर पाटील याचे व अजम इष्ट-डमेण साहेबाचे न बनले. सा तेथून निघोन बडोद्यास अजम मेहेजर वार साहेब व सिनोर मीगेल साहेब याजकडे आला. तेथेंही समजूत न पडली म्हणोन तेथून निघोन मुंबईस जाण्याकरीतां जंबुसर प्रगण्यांत आला. हे वर्तमान इष्टडमेण साहेब यास समजल्यावरून आम्हांस पत्र ली। की पाटील तुमचे पोयात आला आहे. त्यास आणावयाकरीता जासुत पो आहेत याजबरोबर पाठऊन द्यावा म्हणोन ली। परंतु पाटील आमचे प्रग-ण्यांत आला हे आम्हांस कांहींच माहीत नवते. म्हणोन शोध केला तो टंकारी बंदरी शोध लागला. त्याजवरून माणसे पाठऊन मा।रनव्हिस येथे आणीले. नंतर इष्टड साहेब याचे राऊतास सांगितले कीं तुम्हीं मा।र-नीव्हेची समजूत करून घेऊन जावे. त्याचे उत्तर जाहले कीं आमच्याने समजूत होत नाहीं. मग पाटील यांस सांगितले कीं आम्हांस दोस्ती पत्र लीहून तुजला बोलाविले आहे तर तुला जावे लागेल. त्याजवरून पाटील याचे उत्तर जाहले कीं ऐसी चाल नसता नवीन चाल तुम्हीं करीत असल्यास माझा उपाय नाहीं. त्याजवरून इष्टडमेण साहेबास पत्र लीहून पो कीं पाटलाचा शोध लागून आम्हीं आपले येथे आणुन ठेविला आहे. तुमचे राऊत आले होते त्याच्याने समजूत जाहली नाहीं. यांजकरीतां दुसरा कोणी शाहाणा माणूस पाठऊन मा।रनीव्हेची समजूत करून घेऊन जावे. आपण जाणोन पत्र ली।. त्यास प्रांतात चाल आहे कीं दुसरे प्रगण्याचे लोक आपल्या प्रगण्यांत येऊन आपली पाठ निघोन राहीले तर त्याची समजूत होऊन ते जाण्यास राजी जाहल्याशिवाय दुसऱ्याचे हाती देऊ नयेत. दोस्ती-मुळे देणे जाहले तर आपले पोटचे द्यावे परंतु पाटीचे देऊ नये म्हणोन लीहून पा।. नंतर पाटील मा।र याचे म्हणे पडले कीं अजम मेहेजर वार

साहेब व सीनोर मिगेल साहेब याची पत्रे खातरजमेचे तुम्हांस व मजला आले तर मी बडोद्यास जाईन. त्याजवरुन अजम मेहेजर बार साहेब यांस व मिगेल साहेब यांस आम्हीं व पाटील मा॥र याणे पत्रे लीहून पाठवीली आहेत. त्याचा मा॥र सवीस्तर ध्यानास आणुन खातरजमेची पत्रें पाठवावी म्हणोन आपले स्नेहामुळे व अजम मेहेजर साहेब व सीनोर मीगेल साहेब याचे दोस्तीमुळे पाटील यांस पाठऊन देतो. व मा॥रनील्हेही यावयास राजी आहे. अजम मेहेजर बार साहेब यांस पारसी लाखोटा लीहून पा॥ आहे. हा पावता करून उतरे खातरजमेची घेऊन पा॥ पाहीजेत.त्यास पा॥ देणे तर आपले भरवसीयावर पा॥ देऊं. आपले खातरजमेचे पत्र आले पा॥. पुण्याकडील नवल विशेष असलीयास लीहून कलवीले पाहीजे. लोभाची वृर्द्धीगता असावी हे विज्ञापना.........

61]

Krishnāji Malbār Phāṭak, an official at Jambusar, reports to Gangādhar Shāstri that the patel of Dayādra in the Broach pargana of the Company having a grievance against Mr. ईष्टमेण (East ?) came to Jāmbusar with a view to sail to Bombay to get his grievances redressed. Mr. East (?) asked Phāṭak to send the Patel back but as the Patel was not willing to do so, Phāṭak politely refused to surrender him. The Patel being willing to go to Baroda if assured of safety by Major Barr, the writer requests the Shāstri to send the necessary letter to Major Barr or to himself from Poona.

62] [Before 1815

श्री. नकल.

यादी रोजनीसी वर्तमान आबाजी गोविंद पुणीयाहून बडोद्यास गेले. त्याही एक त्रिंबकजीकडील खिजमतगार दरम्यान समजोन सितारामबावास पत्रे लीहीली कीं आम्हांस पुणीयाहून पो आहे कारण तुम्हांस येथे अडचणी काय होताल हे सांगावे. त्यावरून सितारामबावानी उत्तर केले कीं, येवसिंचे, उत्तर विचार करून सांगू. त्यारून आबाजी गोविंद याणी पांच सात दिवस मार्ग पाहून पुन्हां विचारीले. त्याही उत्तर केले की आम्हांस जाचणी कांहीं होत नाही. आणि तुम्हीं आम्हांस पुसु नये. याप्रो उत्तर जाले. नंतर आबाजी गोविंद पुण्यास आले. त्याचे बातमीस गोविंदजी बंधुजी लागले आहेत. ठीकाण लागले नवते.......

62]

Extract from copy of an informant's diary without date. It says:—Ābāji Govind went to Baroda from Poona and sent letters to Sitārām Rāoji through a menial of Trimabkji Dengle asking him for details of his harassment by Baroda officials. Sitārām gave a curt reply on which Ābāji returned to Poona. Govindrāo Bandhuji is searching for Ābāji in Poona.

---

श्री.

63] [Before 1815

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री शास्त्रीबावा स्वामिचे सेवेसी

विद्यार्थि मल्हारराव हरी सा दंडवत विज्ञापना ताा छ १ माहे

ज़िल्हेज पावेतो मुकाम नडयाद येथें संतोषरूप जाणोन स्वकीये कुशल लीहीत असीले पाहीजे. विशेष. अजम कपतान स्पेलसली साहेब पलटणीसुधा रवाना केले ते आताच येऊन पावले. त्याजबरोबर अजम मेजर साहेब याचे पत्रातील आज्ञा कीं तुम्हीं साहेबाचे हुकुमांत चालोन बातमी वरचेवर साहेबास येईल तसी समजावीत जावी मणजे कोल्याचे बंदोबस्तास अवघड वाटणार नाहीं. बुलबी साहेबाबरोबर स्वारीस जात जावे म्हणोन आज्ञा. त्यास आज्ञेप्रा साहेब हुकुम करीतील त्याप्रा चालत जाईन व बातमीही पोहोचवीत जाईन व स्वारी बरोबर जाईन, सदासीव वगैरे यांसी कोल्याचा मेलावा केला होता तो वारला. त्याची ठेवणूक सिबंदी दोनसे स्वार व पांचसे माणूस घेऊन लष्करवाल्याकडे गेलो म्हणोन काल बातमी अली व लष्करवाल्याचे पांचसे स्वार व हजार कोली ऐसे वर्तमान आले. सवीस्तर काल राजश्री बापु नि॥ श्रीपतराव नारायण कादार पो महमदाबाद हे बडोद्यास गेले आहेत ते सांगता विदित होईल. बहुत काय लीहीणे लोभ करावा ही विज्ञापना॰

63]

Malhārrāo Hari writes to Gangādhar Shāstri from Nadiād giving information about the arrival of the Company's forces to check the Kolis. The letter is imperfectly dated.

---

64] [Before 1815

श्री.

चिरंजीव राजश्री शास्त्रीबावा यांस बापुजी केशव पटवर्धन कृतानेक आशिर्वाद उपरी येथील कुशल ता॥ कार्तिक वा॥ २ पावेतो मु॥ विजापूर

येथे क्षेमरूप असो. विशेष इकडील मा॥र पूर्वी दोनतीन पत्रीं ली॥ आहे त्याजवरून कलो आला असेल आपले लीहील्याअन्वये ति॥ बाबा लेले याचे ऐवजाची तरदुद करोन पेशर्जीच ली॥ आहे. त्याजप्रमाणे बाबास ऐवज... देवावा. दुसरे येथे वर्तमान ऐकीले...कासी ह्यावीसी गाव...आम्हीं हरकत कर्तो...वारंवार समजावीतात. त्यास आम्हीं रा॥ देवराव कासी येथें आल्यापासून माहालासंबंधे कांहीं एक कामास हरकत करीत नाहीं आणि पुसतही, नाहीं. जितके सरकारकाम होते त्याची वहीवट मात्र लीहून ठेवीतो ऐसे असता उलटे आमचेच बोभाट समजावीतात. याजवरून आपूर्व वाटते आम्हीं कोणते तऱ्हेनें भिऊन चालतों ते ईश्वर जाणत असेल. ऐसे असता आम्हावर आदावतीच करीतात त्याय उपाय नाहीं. आम्हांस येक आश्रय तुमचा मात्र. हे मोठे. तेव्हां बोलतील ते प्रमाण. असो, आम्हीं याचे कामाचा नाश करतो असे असते तरी ई...गाव कसे चुकचे १ येक लाख दाहा हजार पर्यंत रास्ती गाव झाडून चुकले. पांच च्यार रास्ती चूकोन आहेत. तेही आठ च्यार दिवसांत चुकतील. बाकी पंचवीस हाजार रुा॥याचें गाव मवासी मात्र राहीले. तीन हसे याचे रुा॥यास ठीकाण जाले. येक शेवटचा हसा मात्र राहील. यांवरून आनूमान पाहावे खरेखोटे म्हणजे ध्यानांत येईल. मोजे पामोल येथील पाटलाचे खत कोरे कागदावर मतु करून केले आणि आकडा गु॥ पेक्षा जाजती शंभर रुा॥ घातला. गाव नादारीस आला. शंभर रुा॥ सोडावे म्हणोन बोलीला परंतु ऐकीले नाही. पाटील आम्हांपासी कागद तुम्हांवर...दिल्हा नाही कारण हे तेथे आले... पाठवीले याजकरीता...वलवंतराव कासी, देवराव कासी याचें मानस आम्हीं नसावे हे पुरतेपणे आहे. त्यास येथील जमाबंदीचे काम माघ आखेरीस उरकेल आणि घरातील गुंता आठवा महीना आहे हेही होईल आणि फालगुन मासी तुम्हांजवळ येतो. मग दुसरे कोठे शेर नेमून दिल्हेयांस राहूं अथवा तुम्हांजवळ राहू. त्याची कालजी करीत नाहीं. तितके असोन मारनीलेचे सांगीतल्यावर आगोधरच यावे ऐसे असल्यास उपाय नाहीं. जसे लीही-

ण्यांत येईल तसे करूं. जमाबंदीची याद आलाहीदा पो आहे ती पाहावी म्हणजे समजण्यांत येईल कलावे. जमाबंदीचे याद मागाहून तपसीलवार तयार करून अजम मेजर साहेब याचे कागदात बीढ्ठ. त्याजवरून ध्यानास येईल. येक लाख दाहाचा ठीकाणा जाला. वसूलाचे काम लावीले आहे. आम्हीं कांहीं हरकत कोणे गोष्टीची करत नाहीं. कलावे लोभ कीजे हे आशिर्वाद.

64]

An imperfectly dated letter written by Bāpuji Patwardhan, from Vijāpur, to Gangādhar Shāstri. The writer says that he has nearly completed the collection work in the mahāl and that since the arrival of Balwantrāo Kāsi and Deorāo Kāsi at Vijāpur, he has ceased doing all other Mahal work. The writer deplores the hostile attitude taken up by the Kāsi brothers towards him.

---

[Before 1815

65]

श्री

श्रीमंत श्री गंगाधरशास्त्री बोवे दंनदंन अधिक प्रताप सुकंम मेजे लवडथी ला. सदसुभवीछते सेवक महता उदयरामभाईना ससटं नमसंकार वचंजे. जत अतर कुशल छे. श्रीमंत श्रीने कुशलतानां प्रतरे लखवा बीजूं लखं कराणं आछे जे जमदर फतेभई संम......सुतलीना टेड सुध काडी नंतरीआ......नं राहेअछे काह छे जे जम्मदर आमीन साहेबने कागल आवस तारा जेग सुपीसु. वासत मेहारबंनी करीने जमदरने ताकीदप्रतरा

मेकलवो. हजुसुधी मजे छापरीआ मंध लवाडीये न्नोसी रअछे. सेवक सरखु कुंमकाजे लखेव फागण वद ७.

65]

Letter from Mehta Udayarāmbhāi who informs the Shāstri that Jamādār Fattekhān is not giving his charge of the place without a letter of authority from Jamādār Amin and requests that such a letter should be sent to him.

---

श्री.

66] [Before 1815

नंबर ७.

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री गंगाधरशास्त्री स्वामी गोसावी यांचे अज्ञाधारक सीवदास भिकारीदास मुकाम सुरत कृतानेक सीर सा दंडवत विज्ञापनां ता आस्वीन शुा ५ पावेतो आपले आसीर्वादेकरून येथास्थित जाणोन स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष बहुत दिवस जाहाले आपणाकडून आसीर्वाद पत्र येऊन सांभाळ होत नाहीं. त्यास येसे नसावे. सदैव आलीया माणसाबराबर पत्र पाठऊन सांभाळ केला पाहिजे. विशेष मोजे भाटे पो चौऱ्यासी येथील जमिनदाराकडे व गावाकडे रूपये दोन हजार येणे आहेत. त्यास दोन तीन बर्ष होत आली. आद्याप रूपये येत नाहीत आम्हीं आपले माणुस पाठवावे तर उतर देतात कीं गांव खानगीकडे आहे. सोयी सोयीनें देऊ. याप्रमाणे उत्तर करीतात. याजकरीतां आपण श्रीमंत राजश्री दिवाणजीस आमच्याकडून विनंती करून जमिदारावर सरकारचे व खानगी ताकीदपत्र पाठवावे कीं वाजवी सीवदास भिकारीदास

याचे रुपये तुम्हाकडे मागणे आहेत ते घ्यावे. याप्रो दोन्ही ताकीदपत्रें कृपाकरून पाठवीली पाहिजे. आपला भर्वसा जाणून लीहीले असे. दुसरे तीर्थस्वरूप सेटजी तेथे आले आहेत. त्यास बहुत दिवस होत आले. आद्याप कामाचा फडशा होऊन रुपय पदरी पडत नाहीं. त्यास आपण तेथे आसोन सेटजीचा फडशा होत नाहीं त्यास आतां आपण कृपाकरून चीतावर धरून सेटजीचे कार्य करून द्यावे. वृद्धापकाली प्रवासांत बसून ठेवावे हे कांहीं ठीक नाहीं. तुमचा आमचा स्नेह बहुत वर्षांचा आणि सेटजीस तेथें बसून ठेवीले हे कांहीं आपणास ठीक दिसत नाहीं. यास्तव सेटजींवर कृपा करांवी. येवज पदरी पडे येसे करून रवानगी करावी. सर्व वर्तमान राजश्री लक्षुमणपंत आद्या जबानी सांगता कळु येईल. विस्तारे सुज्ञास लीहावे असे नाहीं. सेट-जींचा फडचा होऊन रवानगी केंली पाहिजे. बहुत काय लीहीणे ? कृपा लोभाची वृद्धी निरंतर आसावी. हे विनंती.

66]

Shivdās Bhikhāridās writes from Surat to Gangādhar Shāstri requesting the latter to help him in realising his dues from the landholders etc., of Bhāta in Chorāsi tāluka, a village assigned to the Mahārāja's household department.

---

श्री.

67] [Before 1815

श्रीगुरुभक्तपरायेण वेदशास्त्रसंपन्न मित्रोत्तम राजमान्य राजश्री गंगाधराख्य शास्त्रीबावा दाजीसाहेब यांप्रती

लक्ष्मीनाथजी संस्थान क्षेत्र श्रीप्रतीष्ठान सां नमस्कार विनंती.

येथील कुशल ता। पौष शुा ३ पर्यंत क्षेत्री श्रीचरणी वर्तमान येथास्थित असे. विशेष आपण स्नेहपुरसर पत्र पा। ते पाऊन आवलोकनी भेटीतुल्य आनंद जाहाला तो विशेष चमत्कार. वारंवार पत्रे पा। तोपवीत असीले पाहिजे. आमची प्रकृती माहित आसता आमचा विपर्यासपणा आपण मनांत न आणीता स्नेहवेलीचे बीज्यारोपण करून मांडवास नेऊन फळेंही आणीली. त्यास वारंवार स्मरणोदक पत्रद्वारे पोहोचऊन प्रफुल्य आहे. ती विशेष वृद्धींगत होय असें करीत असीले पाहिजे. देवाचे गाव जाहागीरीचे तुम्हीं सर्वांनी येकचीते करून दिल्हे आहे. तेथील मोगलाई अमल आहे. तो देवास संस्थानाकडे करून घ्यावा म्हणजे येक हाती ठीक पडेल आणि प्राप्तीही विशेष होईल, त्यास येवीसीचा उपेग हरतन्हेने करून देवाचे कार्य करावे. आपण सूज्ञ आहा त्या आर्थे लेहून विशेष कलवावे आसे नाहीं. सूचनार्थ कींचीत लिहीले असे. लोभ वृद्धी करावी. दाजीसाहेब ममतेत आंतर नसावे हे विनंती.

67]

Letter from Laxmināth of Paithan (Nizām State) requesting Gangādhar Shāstri to arrange for ceding to the temple at Paithan the existing Muslim jurisdition over the village granted to it as a Jāgir, through the efforts of the Shāstri etc.

---

68] [Before 1815

श्रीगणराज

श्रीमत्समग्र–शक्रादिलेखर्षमोत्तमांगकीरीटिवज्रादि – मणिमरीचिमंजरी–नीराजितपदपाथोजापर्णाजात्याराधनापार्णभूतेषु फणिमणिति विवेकप्राप्तामल-वैदग्ध्येषु सुहृद्वृद्धिधूयत्सु राजश्री गंगाधराभिधेषु.

सौहार्दार्थिना राजारामात्मजमहीपतिसंज्ञकेन प्रबद्धकरसंपुटं विहितामा-साष्टांगप्रणतीनामावेदकोयं पत्रप्राणिधि.

विशेष. आपणाकडोन पत्र येऊन सांभाल होत नाहीं त्यास ऐसे न व्हावे. सदैव पत्रद्वारे परामर्ष घेत असावा. यानंतर आपण येथुन बडोद्यास गेलेत ते काली समक्ष परस्परे मजकुर बोलण्यांत आला त्याचे आपल्यास स्मरण असेलच परंतु सुचना असावी यदर्थी विनंती लीहीली आहे. ऐसी-यासी आपले समागमाचा लाभ सत्वर होईल असे घडण्यात यावे.

उदयेन्नेव सविता पद्मेष्वर्पयते श्रियं
विभावयन्समृद्धीनां फलं सुहृदनुग्रहः

सुज्ञास बहुत काय लिहिणे ? कृपालोभाची वृद्धी सदोदित असावी हे विनंती.

68]

A letter with an ornate superscription in Sanskrit from one Mahipati Rājārām to Gangādhar Shāstri reminding the latter of their personal talk and requesting an interview.

---

69] [Before 1815

श्री.

चिरंजीव राजश्री रावसाहेब व भाऊसाहेब व आबासाहेब यासी प्रती लक्ष्मण सीवराम कृतानेक आसीर्वाद येथील कुशल ता। भाद्रपद शु॥ २ पावेतो मुकाम कसबे पराती येथे येथास्थीत जाणोन आपलेकडील आनंदवृत्त लीहीत आसावे

वीशेष. ये प्रगाण्यांत मवासी गावे दाह पंधरा आहेत त्याचे जामीन आज्यापी पडेत नाहींत, चीव्या माघा......टाकीतात त्याने शासन जाले पाहिजे. त्याचे पो...न घेतल्यासीवाय बंदोबस्त राहत नाहीं. या....शंमर दोनसे स्वार व शंभर पायदल यक महीना पा...रा भाऊसाहेबास व करनेक साहेबास... मुदाम कासीदाबरोबर विनंती लीहीली व हाली...मुदाम खेप्या पाठवीला आहे. त्यासी राजश्री....स सांगून भाऊसाहेब व करनेक साहेबासी बोल......स्वार प्यादे पाठवीण्याची व ठेवण्याची आज्ञा पाठवावी अथवा आजम यारुभाई याजवर पत्र सरकारचे नीक्षुण पाठवावे की पराती प्रग.ण्यातील गावे फैल जामीन देत नाहीत. त्यास आणा सांगतील त्या प्रो स्वार पाठऊन फैल जामीन घेऊन द्यावेत. रावसाहेब ! हे काम लोकर केले पाहिजे. भील लोक बाजरी खाऊन गेले म्हणजे हातास लागणार नाहीत. यास्तव सदरी लीहील्या प्रो लोकर करावे. पेशजी पत्र पाठवीले आहे त्यात पथनीचे पत्र आहे ते...पावते करावे कलावे हे आसीर्वाद. शिवेसी आणाचा सां नमस्कार विज्ञापना पेशजी वडीली देहगावास येते समई आम्हाकडील कासीद आपणास सोपुन आलेवर पत्रे सरकारची जाली तसीच कासीद आला. त्या व...जाहाली पुन्हा कासीद पत्रे सो...सोास वगेरे पाठवीली आहेत हीं जीकडील तीकडे...न सरकारी पत्रे...पाठवावी बाबासो फार...लीहू श्रुत होय हे विज्ञापना.

69]

An imperfectly dated letter from Laxman Shivrām of Prāntij to Bhimāshankar, Vitthalrāo Bhāu and Krishnarāo Marāthe requesting executive assistance for getting security bonds from the Mewāsi Bhils of Prāntij pargana.

70] [6-2-1815

पो. वडोदें माघ श्रुा ५ नकल
संवत १८७१.

श्री.

यादी छ २५ रोज सफर सन खमस आशरचे वर्तमान चर्मी जोड्याचे रस्त्यानें ग्रहस्त भगवंतराव गायकवाड चालला. पुढें इतमाम त्राण दोन बांडे व हेटे च्यार व बोथाट्या व स्वार दोन मागे असे गेले. याप्रमाणे पाहून आम्ही शुक्रवारचें हवेलीस गेलो. तेथें दरबार जाला. त्याचा मजकूर दिनचर्या पेठणकर गोसावी व भागवत व बाळशास्त्री व जवळ देशमुख होते व मंडली खाली कचेरीत होती. याप्रमाणे जाले.

पेंढारी हांडे हर्देचे घाट नर्मदा एलतीरी उतरले. अजमासे साट हजार आहेत. त्याचा आपसातील कटकट मिटुन येकत्र होऊन आले आहेत ऐसे वर्तमान आहे म्हणोन बाळाजीपंत आत्रे याचे विा.

70]

Copy of a scrappy news-jotting received from an agent of Bālājipant Atre of Poona. The writer saw Bhagwantrāo Gāikwād, walking well shod by the street, with armed attendants before and behind; after which the writer went to the Peshwa's Shukrawār Palace, where an audience was held. About 60,000 pendhāris are reported to have reached the southern bank of the Narmada, near Handia-Harda (C. P.)

१ भगवंतराव गायवाड आले त्याबात पत्रे व खीजमतगार आले ते तुम्हीं आम्ही समक्ष तपासावे कीं खरे आहे कीं खोटे आहे. तुमचे बोलणे मारनीलेचे सरदारीचे बंदोबस्ताकरीतां त्यास खुदचे सांगणे ऐकावे हा पक्ष स्वतंत्र दरीया दौलतीची पैरवी प्रथमपासून सरकारातून कशी होत आली हे कागदपत्र पहावे. गोविंदराव गायकवाड यांचे जाबसाल उगवीले. त्याज-वरून आमचे हक्काच्या दर्ज्या आहे सा आम्हीं खावंदगीरी करीतो कींवा उगेच गेरसनंदी वाद घालतो हेही तपासावे. तुमचे आमचे तहनामे झाले आहेत ते जमेस धरावे किंवा मागील चाली मंजूर धरून इमान ज्याचे त्यास करू लागले असता तुम्हांस व आम्हांस दौलतीवर वारसा होणार नाहीं. त्यास भगवंतराव गायकवाड यांची पंचाईत मनास आणल्या-शिवाय हा जाबसाल उगवत नाहीं हे सरकारची मर्जी...कलम

१ कोणती दौलत निर्वेध नाहीं. खटली आहेत. आशा जीकीरी माहाराजास पसंत आसल्यास हुकुम करणे असेल तो करावा व लाट साहेबासही लीहून महाराज पाठवीतील ऐसे साहेबी उत्तर रोख केले......कलम.

१ कारभारी यांचे म्हणे कीं सरकारची मर्जीस अद्यापतरी कां ना म्हणता ? सनदा वगेरे कागदपत्रांशिवाय दौलती चालत आल्या कीं काय ? हा मार तुमचे आमचे विचारे ठरत नाहीं ते पक्षी रूबरू बोलणे करावे लागेल. यातील दर्ज आम्ही बोलुं नये. तुम्ही उभयता कारभारी आहा. हा पेगाम नवा. हा थोडके रोजांत आटोपावयाजोगा दिसत नाहीं......कलम.

१ पुढें एका दिवसाआड समक्ष महाराजांशीं बैठक होऊन जाब-

सालात जे ठरता ठरेल ते खरे. आम्हीं दररोज दरबारास कलवत नाहीं......कलम.

---

४

---

७

सदरहु कलमे बातमीची सांगितली. तेव्हां साहेब म्हणाले बहुत तफावत नाहीं......कलम.

२. साहेबी मजकुर बैठकीतला मार सांगितला......कलमे.

१ काठेवाड प्रकर्णी बोलणी—

१ करार ठरल्या त्याप्रा। ऐवज बडोद्यास देण्याची मर्जी नसलीयास अमदाबादेस देतील. आम्हीं सांगितले कीं, अमदाबादेस देऊ सकणार नाहींत कारण अमदाबादी चलनास बडोदीपेक्षा बटा बसतो व हाली नवे चलन केले आहे तेव्हां दर सदे फार पडेल. सा। तालुकदार कसे देतील ? तेव्हां सा। म्हणाले हे कांहीं मला वाकफ नैते......कलम.

१ महीकांठ्यांत आमल ठाणी यावीसी बोलणे पडले. त्याचे उत्तर केले कीं आमल ठाणी कोठे बसली व बाकी आहेत त्याची याद द्यावी. तपासू. तेव्हां उत्तर जाले कीं, यादी आणून पाठवीतो. याबा। साहेब पुसू लागले कीं, ठाणी होती तेथें आमल दाखल दिल्ही. दखल होणें ऐसे ठिकाण राहीले नाहीं. व कांठ्यांत ठाणी आमल आहेत ऐसेही लक्षांत येत नाहीं.

२ दौलत प्रकर्णी बोलणें जीकीर फार जाली ते स्मरणात कांहीं

नाहीं. सारांस वसईचा तहनामा जाला व त्यात आमचा हक्क कमी पडावयाचा नाहीं. त्याचे उत्तर साहेबी केले कीं, तहनाम्यास बाध होईल (फाटलेले) तहनामा मनाचे धोरणाने होईल......कलम.

२ वरकड कीत्येक पर्याय तीन प्रकारचे आहेत. तीन तहनामे जाले आहेत. त्या माफक चालले पाहिजे. दुसरे गायकवाड यांस ग्वालेटी आहे. तिसरे दरकार तपासावयास वाजवी नाहीं ऐसे तीन अर्थ आहेत. त्या पेक्षा हे बोलण्याची जरूर नाहीं...कलम.

येणेप्रमाणे बोलणे जाले.

३ भगवंतराव गायकवाड यांस बंधूजीसी लाऊन आम्हीं खासे व सर्वांची संमते आहेत असे बोलवीतात व बंधूचा उपक्रम बोलण्याचा. "आमची दिवाणगिरी कायम राखून जे नेमुन द्याल ते घेऊ, आणि सारी दौलत सरकारची बंदोबस्त करावयास आयास पडणार नाहीं. आमदबाद आपल्या हातात. तेथें सरंजाम आहे. सितारामबावास वाह्यांतर सरकार लक्षितात तसे गायकवाड यांचे आतुन संमत आहे. भगवंतराव यांस ज्यांणी पाा त्यास पुसावे." ऐसी बोलणी बोलतात. त्यावरून श्रीमंताचे ध्यानांत हे पक्के बसोन प्रतीनीधी सचिव यांचें दौलतीचा बंदोबस्त केला तसा हाही करावा ऐसे ऐकतो. हे वर्तमान ऐकोन साहेबास बोललो "मोठे ताजूब आहे"...कलम.

४ भगवंतराव गायकवाड यांस पांच हजार रुाा खर्चास लागले तर द्यावे व अेक पोशाक द्यावा ऐसी आज्ञा श्रीमंताची जाली म्हणोन दादा व बाबांनीं लीाा तो मार सांगीतला. तेव्हां

साहेब म्हणाले हे काय ? आम्हीं सांगीतले कीं, ताजला अडचण होती म्हणुन ते मागणार सा। मी लीा होते. त्याचे उत्तर ऐसे आले व त्यास लौकर पा। ऐसीही आज्ञा जाली म्हणून लिहीले. त्यास हाली ते राजकारणांत तेव्हां देवदर्शन येकीकडे राहून बडोद्यास जाण्याचा अर्थ दिसत नाहीं. हे कत्रीमी वेव्हार बडोद्यास श्रीमंताचे गांवी नाहीत. चिंचवडास भगवंतराव आल्यापासून उपस्थित जाले. ही खबर बडोद्यास पोंचल्यावर उत्तर येईल. त्यानवरून मुफसल कलेल...कलम

५ आम्हीं विचारीले कीं उद्या बैठक होईल कीं काय ? तेव्हां साहेब म्हणाले मालूम नाहीं. मग बोलले कीं आम्हीं आज निरोप सांगून पा। कीं, काठेवाड प्रकर्णी आम्हीं पेशजी बोललो व तुम्हींही बोलला आसता. हाली तुम्हीं व डेंगले नाहीं म्हणता हे ताजुब वाटते. उद्या बैठक जाली तर होईल...कलम.

६ पेंढारी पन्नास हजार नर्मदा उतरले हे दाट लोक बोलतात याची खबर कांहीं आली कीं नाहीं. तेव्हां साहेब बोलले आली नाहीं...कलम

७ डेंगले स्वारीस कधी जाणार ते पुसले. तेव्हां म्हणाले दोन बैठकींत जीकीर नाहीं...कलम

सदरहु बोलणे होऊन सायंकाली वाड्यांत आलो.

71]

Diary of Gangādhar Shāstri reporting his interview with Elphinstone at Poona. Elphinstone asked what the Shāstri had heared of his (i.e. Elphinstone's) conference with Bhāu Māṇkeshwar the previous day.

The Shāstri told him according to his information the points discussed in that conference, on hearing which Elphinstone gave a more exact account to the Shāstri. It was agreed at the conference that the Kāthiawād tālukdārs should pay their tributes at Baroda or Ahmedābād. The Peshwa referred to his claims over his military posts in Mahikāntha, to which Elphinstone replied that he could not remember any such untransferred posts in Mahikāntha over which the Peshwa had any claims. The Peshwa declared that nothing contrary to the treaty of Bassein and to the three other treaties or agreements should be done.

There was some conversation about Bhagvantrāo Gāikwād, the last Sarsubhedār of Ahmedābād, who was then on a visit to Poona propably at the instigation of Sitārām Rāoji. The Shāstri explained that Baroda Govt had sanctioned Rs. 5000 for Bhagwantrāo's pilgrimage expenses and had no idea or information of Bhagwantrāo's perfidy.

After inquiring about the march of the pendhāris and Dengle's departure from Poona on tour, Gangādhar Shāstri came back home in the evening.

(N. B. Compare Gense and Banaji, Vol. IX,

pages 50 *et. seq.*)

72 [10, 11-2-1815

श्री.

संवत १८७१ नकल

यादी मुा पुणे सन खमस अशर मयातेन व अलफ.

१ छ २९ सफर माघ शुा १ गोविंदराव बंधूजी प्रातःकाली त्रिंबकजी डेंगले याचे घरी गेले होते. च्यार घटका बसून भगवंतराव गोा याचे घरी जाऊन आपले घरी येऊन डोके बांधून निजले ते अस्तमानी मंडलीसुद्धा भोजन केले. भगवंतराव याचे घरी वाघोलीकर जाधव येऊन च्यार घटका तिसरे प्रहरी बसून गेले. डावरे ज्याचे शिलेदार आा ५ आपले सरकारात पेशजी चाकर होते ते साहा घटका दिवस राहाता आले. दोन घटका बसले होते. दुलभ उभयताकडे तिसरे प्रहरी गेला होता...कलम

१ छ १ रोावल माघ शुा २ गोविंदराव बंधूजी त्रिंबकजी डेंगले याजकडे जाऊन तिसरे प्रहरी दोन घटका बसोन भगवंतराव गोा याजकडे गेले तेथे दुलभही होता. दोन घटका बसुन घरी आले. मर्जी दिलगीर. दागीने दिवाणाकडील सुर्तेस गाहाण पन्नास हाजार रूास होते ते पुण्यास आणवीले आहेत कारण हे फरोस्त करून याजवर पांच च्यार हजार रूा आल्याने चरितार्थ चालेल सबब.

---

२

या प्रमाणे वातमी आहे.

72]

Copy of a newsletter dated Poona, 10th and 11th Feb. 1815 from an unknown informant describing

the movements of Bandhuji and Bhagvantrāo :- Bandhuji is worried and hard up. Ornaments worth Rs. 50,000 belonging to Sitārām Rāoji that were pawned at Surat are brought to Poona for sale. Dengle and Dullabh Sheth appear to be on intimate terms with the pair.

---

73] [8-3-1815

श्री.

रोजनसी स्वारी पुणे सुा खमस अशरमयातेन व आलफ माहे गोवल माघ मास छ २६ वा। ३० बुधवार. दोन प्रहरी आम्हीं व बापु ऐसे बंगल्यास साहेबाकडे गेलो दस्तुर माफक मुलाकात जाहाली. यावर थोरले बंगल्यास साहेब व करोस सो। व रसल सो। व पातजल सो।.......... ..........भाऊचे जाले तो मजकुर.......जीवनराव यांस आपलेकडे सांगावयासी पाठवीले त्याजवरोन कलले असेल. उद्या बेटकीचा बेत आहे. आपले इतला आला असेल. त्यावरोन साहेब बोलले "मार कलला, बेटकीचा इतला आम्हाकडे आद्याप आला नाहीं"...............कलम.

२. साहेब म्हणाले कीं, "तुमचे नांव यामुले श्रीमंत बोलतील हे आकलेनी वाटते. त्यास उद्या बेटक जाली तर बोलावे कसे ?" आमची तयारी आहे त्यात गुंता नाहीं. कार्तीक स्वामीस जाते वेलेस श्रीमंतासी करार केला तो स्वारी आल्यावर सींहीस कोठे गेला कीं आता येईल ? ते पहेन्न हा भरवसा कशावरोन धरावा ? आम्हांस रजा द्यावीत." तेव्हां साहेब म्हणाले " हे तर खरे यात फायदाही आहे. परंतु श्रीमंत बोलतील त्यांस उत्तर आम्हीं योजीले आहे कीं भगवंतराव व बंधुजी येथे येऊन सां-

तात त्यापेक्षा आम्हांस दरम्यान राहावयाची गरज नाहीं व शास्त्रीबोवास राहा म्हणे हे जरूर नाहीं. जर करता भगवंतराव व बंधुजीस काढून दिल्हे आणि हा फेसला होतो हे खचीत मनांत धरले ऐशा दोनही युक्त गोष्टी याची आम्हांस खातरजमा वाटली तर आम्हीं दरम्यान राहून......शास्त्रीबावा......चे मनांत......जाले"..........कलम.

३. श्रीमंताकडे बंधुजीवीसी आपण सांगुन पाटवीले त्यांजवरोन भाऊनी मोदीकडे इतला केला कीं "हे गोष्ट साहेबी बोलु नये. यात श्रीमंताची प्रसन्नता नाहीं. याबीसी तुम्हीं साहेबासी बोलावे." मोदी याणी उत्तर केले कीं "हे आम्हीं बोलणार नाहीं व तुम्हीं साहेबाची मर्जी खटुं न करावी." त्याजवरोन याणी सरकारचा आपल्याकडे बोलण्यास पो। म्हणोन ऐकतो. तेव्हां म्हणाले कीं "येसे सांगुन पाटवीणार नाहींत. पाठवील्यास आम्हांस जरूर बोलले पाहिजे कारण पुढें श्रीमंत आम्हांस म्हणतील कीं हे पूर्वी कां न समजावीले ? तेव्हां जरूर आहे, बोलावयास कीं बडोद्यास सितारामबावा फतेसिंगराव याचे मुखत्यारीत खलेल करूं च्याहतात याबीसी मुदे शाबुत जालेवरून याचा बंदोबस्त फतेसिंगराव याणी केला. त्यांस हवाला करावे अगर काढुन द्यावे येसे आम्हीं म्हणणार परंतु आपले चीत्तात शंका मोठे फेसल्याचे बोलणे दौलतीचा आहवाल समजावणे आम्हांस जरूर. तेव्हां बंधुजीस काढुन समजावणार येसे येईल सबब आम्हीं तुर्त बोलत नाहीं. दोलतीचा भार आपले नजरेस येऊन फेसला ठरेल त्याकाली याबीसी बोलु." ऐसे साहेब बोलले...कलम

श्रीमंताचे मनांत दोन आर्थ आहेत कीं आम्हीं येथें साहेबाचे लगत मोठी तेव्हां समक्ष फेसला कारभारी याचा विश्वास नाहीं सबब ठरवोन रा। करावी हा येक पक्ष. दुसरा पक्ष कीं कांहीं दिवस कुजवावे. कार्तीकस्वामिस स्वारी जाणार तेव्हां आर्थातच मागे पडेल.

तेव्हां साहेब बोलले कीं, "फेसला करून..............." सदरहु प्रमाणे बोलणे होऊन नीरोप घेऊन लस्करांत तीन घटीका रात्रीस आलो.

73]

Gangādhar Shāstri's diary for 8-3-1815 :—It gives the conversation between Elphinstone and the writer about the Peshwa's consulting Bhagwantrāo and Bandhuji and starting discussion regarding the Baroda matters in dispute. Elphinstone said he would tell the Peshwa that the British Government would take no interest in the Peshwa-Gāikwād settlement and would not ask the Shāstri to stay on at Poona unless the above-named two agents of Sitārām Rāoji were dismisssd from the Poona court. The Shāstri conjectures that the Peshwa might adopt the alternative of simply killing time until his departure to Kārtik Swami on pilgrimage, after which the whole matter might be shelved.

---

74] [12-3-1815

पो फालगुन शुा ११ सां १८७१ नकल

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सन खमस अशर मयातेन छ २० रावल फालगुन शुा १ रविवार. अजम हनरावल इल्फीष्टण सो। धिकारीस गेले होते ते आज येताच आम्हांस इशारा आल्यावरून दोन प्रहरी आम्ही व बापु ऐसे बंगल्यास गेलो. दस्तुर माफक मुलाकात होऊन थोरले बंगल्यांत

सो। व करोस सो। व रसल सो। व पातंजल सो। व आम्हीं उभयता बसून परस्परें खुषीचे बोलणे जाले नंतर बोलणे......कलम.

१ साहेबी पुसले कीं "विशेष काय"? आम्हीं उत्तर केले, "श्रीमंताची व भाऊची बेठक छ २८ तेरीखेस जाले. त्यांत करार कीं सोाबाची मर्जी रक्षावी. बखेडेखोर यामुले कामाचा नाश करोन घेऊ नये असी बातमी आहे. दुसरे बखेडेखोर बहुत हवालदिल जाले आहेत असी श्रीमंताजवल कोणी खबर सांगीतली ? तेव्हां श्रीमंत बोलले यामुले आमचे राजकारण आम्हीं बुडवावे कीं काय ? तसे आबरूसी खलेल होऊं पावणार नाहीं त्याजला काढुन द्यावे आगर मुंबईस पावते करावें ऐसे ऐकतो." तेव्हां सो। बोलले कीं, "हवाली होण्याचा आमचा करार आहे त्याविसी खातरजमा जाली तर पुढे राहणे व जाबसाल सुरू करणे याचा मदार करीता येईल."...कलम.

२ भगवंतराव यांस सरकारचे पत्र बडोद्याहून आले ते वांचुन दाखवीले. नंतर ते पत्र आपणाजवल साहेबी घेतले कीं कारण पडल्यास देता येईल परंतु बुध्या घ्यावयाचे नाही कां कीं आमचे बोलण्यावर त्याजला रूसकत देतील ऐशा प्रसंगांत हे पत्र दिल्हे तर जाहीर होईल कीं पत्र बडोद्याचे आले म्हणून ते नीधुन गेले. आपण जीकीर कर्तो म्हणून रूसकत केली असे होणार नाहीं. यांत फायदा काय ? सबब सो। घ्यावयाचे नाहीं. बोलण्याचे नीकडीने त्याची बीदाई जाहीर जाल्यांत फायदा आमचे सरकारास व तुमचे सरकारास आहे.............कलम.

३ साहेब म्हणाले काठेवाड प्रकर्णी मजकुर कर्नल सोाचे लीहील्याप्रो मुंबईहून आम्हांस लीहून आला. त्याजवीसीं आज बोलावयाचें आहे. बोलु. परंतु आम्हीं बोलतो यांत पेशवे सरकारचा फायदा

असता सुभेदार तंटा उभा करीतात. यांत फायदा त्यांस काय आहे ? आम्हीं उत्तर केले कीं तुम्हीं............सरकारचा नफा आहे परंतु सुभेदारास नुकसान आहे. कोणते कीं फोज वगेरे खर्च दाहा रूा जाला. त्याचे पंचवीस रूा सरकारात समजाऊन पंधरा रूा खेलवावे हा फायदा सुभ्यास तुम्हीं बोलता त्याप्रो जाल्यास मग खर्चाचे कारण राहीले नाहीं तेव्हां पैसा कोठून मिळणार ? ही नुकसानी सा सुभेदार ऐसे तंटे उभे करीतात...कलम.

४ त्रिंबकजी आज बोलावयास येणार. इशारा आला होता म्हणुन साहेब बोलले...कलम.

५ (गाळले)

६ पेशवे साहेबाचे दिलात होलकर सींदे भोसले सरदार आमचे हुकमात यावे सबब आम्ही कंपनीसी दोस्ती करून तहनामा केला. तेव्हां साहेब बोलले जे हुकमात नाहींत जुदे जाले हुकमत करण्याची शरत आमची नाहीं............लीहीले नाहीं.

७ (गाळले)

८ साहेब म्हणाले कीं पुर्वी प्रमाणेच बोलणे सरकारात बोलावयाचे कीं भगवंतराव व बंधुजी हवाले करावे आणि फेसला करावयाचा मदार आमुक दिवसाचा ऐसी खातरजमा जाली तरी शास्त्री राहतील नाहीं रजा द्यावी जातील. भगवंतराव व बंधुजीचे बोलण्याचा मदार नमोद्यात आला...............शास्त्री राहु सकत नाही याप्रमाणे बोलण्याचे ते बोलु.

सदरहु बोलणे होऊन निरोप घेऊन आडचा प्रहरा वाड्यांत आलो.

74]

Extracts from the copy of Diary of Gangādhar

Shāstri for 12th March 1815 when he saw Elphinstone and had a talk about the reported deliberations of the Peshwa and Bhāu Māṇkeshwar on Baroda matters. A letter from the Baroda Sarkār addressed to Bhagwantrāo was read out to Elphinstone by Gangādhar Shāstri. Elphinstone asked why the Peshwa's Subhedar was raising objections to the Kāthiāwād settlement which was in Peshwa's favour to which Gangādhar Shāstri made a suitable reply. Elphinstone said that he would ask the Peshwa to hand over the persons of Bhagwantrāo and Bandhuji; otherwise the Shāstri would be asked to return to Baroda.

---

श्री.

75] [22-3-1815

राजश्रीया वीराजीत राजमान्य राजश्री दिवाण साहेब यांसी,

पोा यशवंतराव बापुजी मराठे कृतानेक आसीर्वाद विनंती येथील वर्तमान ताा फल्गुन श्राा १२ बुधवार पावेतो मुाा बडोदें येथें यथास्थित असे विशेष आपणाकडोन बहुत दिवस पत्र येऊन कुशल वृत कलत नाहीं त्यास येसे नसावे. प्रथम साप्रंदाया प्रोा महीन्यांत च्यार नीदान तीन रवानग्या तरी पत्राच्या होत असाव्या. इकडील वृत्त तरी राजश्री बज्याबादादा आल्यानंतर पत्राची रवानगी आपणाकडे केली त्यांत लीहीलें आहे त्या आलीकडे पुण्याहून जाबसालाच्या यादी आल्या त्याच्या नकला बीडल्या आहेत त्यावरोन कलेल. सारांश अजम हनरावल इलफीष्टन सोाचे

बोलणे पेशवे सरकारांत गोासरकारचे जाबसालाबीसी नेटाचे पडले आहे. आथः पर लोकरच काय ते ठरण्यांत येईल. राजश्री मेराळपंतभाऊ याणी श्री नर्मदातीरी श्रीशुकदेवजी माहादेवाचे देवालय मातब्बर बांधवीले त्याची अर्च्या श्रुा १० सोमवारी जाली. येथोन सीष्ट मंडली वेदिक पंडीत वगेरे पाऊणशे पावेतो पाठवीले होते नवकुंडी विधानाचा कुंड मंडप केला. प्रारंभ पंचमीस जाला...त्याचे सवीस्तर मागाहून लीहीतों. भाऊचे आग्रहावरोन. त्यांचे खातरेस्तव सरकार आज्ञेने खासगीवाले मजमदार फडणीस आदीकरोन दरकदार, रा सीवपंत तात्या व राजश्री दादा गोडबोले येसी सर्व मंडली समारंभास गेली आहे. समागमे नृत्यांगनेचे ताफे दोन नेले आहेत. खानगीवाले आज कर्णालीस आले असतील. तेथें तीर्थवीधी करोन उद्या अगर परवा येतील व सर्व मंडलीही येईल. खासगीवाले यास नागवल नर्मदातीरी कर्तव्य होती परंतु हा मास उक्त नाहीं व सो सखाबाईची पाली आस्पर्शाची सा तो बेत राहीला. कामरोल येथोन साहा कोस आहे. तेथें श्रीमंत सौा येसुबाईनी माहादेवाचे देवालय बांधवीले तेथें परवाच प्रतीष्ठा केली. तेथें श्रीमंत रा दादासो व बाबासोाच्या स्वाऱ्या गेल्या होत्या काल आल्या. जोडीये बालंभेचे कामाबा मुंबईस जाब गेला आहे तो प्रत्योत्तर आल्यावर आपल्यास लीहू. तसे वरातीवीसीही मागाहून लीहीतो. श्रीमंत रा सयाजीरावभाऊसोाचे लग्नाचा समारंभाचें परत आहेर जाले. वरकड दिनचर्यावृत्त बज्याबादादा लीहीत असतील बहुत काय लीहीणें. लोभ कीजे हे विज्ञापना.

75]

Yeshwant Bāpuji Marāthe writes to Vitthalrāo Bhau (?) on 22-3-1815 giving him news from Poona and Baroda and describes the opening ceremony of the temple of Shukadev constructed on the banks of the Narmada by Bhāu Mairāl and of another temple

of Shiv built by Shrimant Yesubāi near Baroda. He adds that the presents received at the time of Shrimant Sayājirāo's marriage were exchanged.

---

76] [1-4-1815

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे, सुमा खमस आशर मयातेन व आलफ माहे रवीलाखर फाल्गुन मास छ २० रा वा ७ मंदवासर.

१ प्रातःकाली भगवंतराव नि॥ डेंगले मजकडे आले आणि बोलले कीं, "त्रिंबकजीची व आपली पूर्वीच गाठ पडावी मग भाऊची गाठ पडावी, त्याचा बेत कसा?" त्याचा जाब दिल्हा की "बापु चिपलोणकर याचे घरी आहेरास डेंगले याणी यावे आणि आम्हींही भोजनास येतो. तेथे भेट होऊन बोलणे होईल." त्याप्रमाणें आम्हीं तेथें.........तेथें संकेताप्रमाणें डेंगले व मी व.........

१ प्रथमता परज्यन्य वृष्टीचा.........जाहली त्याचे बोलणे जाहले ................कलम.

१ त्रिंबकजी भाऊसी बोलले, "शास्त्रीबावा आले आहेत. बोलणे बोलावे." नंतर भाऊ बोलले, "रोज गु॥ आपणही बेटात गेलो होतो. १. त्रिंबकजी......ही गेले होते. बोलणी संकेतानुरूप जाहली ती ठीकच जाहली." तेव्हां त्रिंबकजी बोलले, "बोलणी ठीकच आहेत. परंतु लग्न लागणे ते नवरा नवरीचे लागते. वराडी याणी मधे बोलावे मात्र. तसे त्यास येवीसी संतोषच आहे. याजकरितां पुढे बोलावे. तेव्हां भाऊ बोलले "मी पूर्वी सर्व अर्थ समजावीले

आहेत कीं येक विहंगमार्ग व येक पींपलीकामार्ग आहेत," तेव्हां आम्हीं बोललो..........परंतु आम्हांस को......
बोलणे जाहले.

......

सदरहु बोलणी याजवरोन कलेल.

76]

Gangādhar Shāstri's diary:—Trimbakji sent a messenger to the Shāstri asking him to see him (T.) before seeing Bhāu Mānkeshwar. A conversation took place between Trimbakji and Bhāu with an exchange of retorts.

*Note*:—The document is in a highly damaged condition.

---

77] [2-4-1815

श्री.

रोज़नीसी स्वारी पुणें सन खमस आसर मयातेन व अलफ माहे राखर फाल्गुन मास छ २१ रोज वा ८ रविवार.

रोज गुा भाऊकडे गेलो. ते समईं संकेत ठरला त्या प्रो रा भाऊ प्रहर दिवस असतां शुक्रवारचे वाड्यात श्रीमंताकडे जाऊन तेथें श्रुत करोन आम्हांस बोलाऊं पाठविले. ते बोलावणें येतांच पांच घटका दिवसास आम्हीं व बापु गेलों. समागमे बापाजी अर्काटकर व जीवनराव दिवाणजी होते. शुक्रवारचे वाड्यांत जाऊन खालचे मजल्यास तावदानाजवळ बसलो. वरचे

मजल्याचे खोलींत श्रीमंत व भाऊ व त्रिंबकजी डेंगले गेले व धुंडिराजभाऊ बसले होते. आम्हीं आलो हे कलताच तात्या गाडे नि।। त्रिंबकजी डेंगले हे बोलाऊं आले. आम्हीं वर जाऊन श्रीमंतांची गांठ पडोन नमस्कार जाला. भाऊनी खडी ताजीम घेऊन नमस्कार परस्परें होऊन बसलो. नंतर श्रीमतांस पेशजी वस्त्रें द्यावयाची नेली होती ते कालीं गांठ न पडतां तसींच राहीलीं. तीं वस्त्रें अमदाबादी भरजरी असवली काठी दुपटा, पागोटे दोन, किणखाप दोन व मलमली ऐशा नेल्या. त्या भाऊचे हातातून श्रीमंतास देविल्या. पागोटें बांधोन नेले तें डोईस घातलें. जड फार म्हणोन श्रीमंत बोलले कीं भारी फार, सांगाल तर काढितो. आम्हीं विनंती केली कीं, काढावे. मग पागोटे दुसरें घालोन दुपटा अंगावरच घेतला. मर्जी प्रसन्न जाली. केवल पोषाख द्यावा हे ठीक नाहीं म्हणोन मोत्याची कंठी नेली होती. ते भाउचे विचारे श्रीमंतांचे गल्यांत घातली. नंतर बोलावयाचा संकेत. यामुले भाऊंनीं सर्वांस उठविले. श्रीमंत व भाऊ व त्रिंबकजी डेंगले व आम्हीं व बापु बसोन बोलणे भाऊचे श्रीमंतासी बोलों लागले कीं "शास्त्रीब्रावाची मनीषा आसी कीं, मी येथें आलो, मिलोन आमचें येजमानाचे काम उलगडावें आणि स्वामीचा लोभ संपादावा. त्यांत ते अर्थ उदयास न येतां चौदा महिने स्वस्थ बसोन राहिलो. चरणदर्शनाचाहि योग न घडला. यामुलें जनांत अलोभ दिसोन आमची वृत्ती उदास जाली. हे वृत बडोद्यास समजल्यावर आम्हांस उठोन यावे असीं पत्रें आलीं. हातीं कृपेचा ओघ होऊन चरणदर्शनाचा लाभ जाला. त्या आनंदास पार नाहीं. दौलत प्रकर्णी सर्व अर्थ मनन करोन निभावणींजोगे स्वामी करणार आहेत. आम्हीं निष्ठेनें वागावें. शेवा करावी, इतकाच आर्थ. त्या आर्थे दौलतीस आधार स्वामीचा पूर्वीपासोन निभावणी होत अली. पुढेंहि स्वामीच करतील.' या प्रो भाऊ बोलल्यावर श्रीमंतांनीं उत्तर केलें कीं, "हासिल कलमें ब्रोलण्यांत तुमचे दोन. येक लोभ अलोभ. दुसरे दौलत प्रकर्णी. तर उत्तर सांगणें ते तुम्हांजवल व त्रिंबकजीजवल सांगेन. याचे समक्ष बोलत

नाहीं. लोभ अलोभाचें उत्तर हेंच कीं तुम्हांकडोन सरकार नुकसान वर्तणुक जाली असतां अलोभास कारण. ते कांहीं नसतां अलोभ कां असावा ? तो आमचे मनींच नाहीं. पेशजीं तुम्हीं वस्त्रें आणिलीं ते समई कंपनीकडील कोणी असावें या अटीमुळें योग न घडला. व आजपरियंत दिवसगत लागली हे कारण तुमचे ध्यानांत असल्याकारणास कारण काये हें आमचे लक्षांत नाहीं. तुम्हीं जाणा. ते कारण गेले तेव्हां आज आड कांहीं नसता योग घडला कीं नाहीं ?" ते काली उत्तर केलें कीं, "स्वामीकृपा होती व आमचे लक्ष चरणीं होतें म्हणोन हा सुवर्ण दिवस आनंदाचा आम्हांस लाभ जाहला. दिवसगत जाले हे आमचे प्रारब्ध. कारणाचें कारण म्हणावें तर आम्हांकडोन मोधीसी स्नेहांत आंतर नवतें. सर्वात्मभावे त्यांसी वागणुक होती. त्याचे मनांत काय किंतु ते आम्हांस आवगत नाहीं. साहेबाकडे बैठकींत मोधीस बोलावणेविसी आम्हीं बोलत गेलो. साहेब न बोलावीत त्यास आमचा इलाज काय ? त्याजवरोन त्यांणीं आपले घर न शोधिता आम्हांवर किंतु धारिला असल्यास न कले. असो सर्वांस औषध आहे. परंतु स्वभावास नाहीं. नंतर पगडबंदाचे सार्वभौमत्व. स्वामीचे स्वामी प्रतापछत्रछायेत सर्वांस सुखरूप निर्वाह होता. आन्य आधार नाहीं." आसे बोलणे ऐकोन श्रीमंतांनीं, आनुभविक, पगडबंदाचे आचरणें जुनराहून पुण्यास येवोन स्वस्थता पावले, तावत्काल परियंत नाना फडणीस, परशरामभाऊ मिरजकर, सिंदे, होलकर, भोसले, वगैरेच्या कृती सांगितल्या. "त्या कालीं सरजेराव घाटगे कामांत वागत होते. ते प्रसंगी मंडली आली असतां वाड्यांतून कसी लौकर हे जातील किंवा काय करतील असें होते. पदोपदी मनांत दगदग वाटोन चित्त अहर्निशी कांचणींत होतें हें सर्व शास्त्रीबावांस माहीत आहे. तें ही ते कालीं येथें असोन वाकफ सर्वां आहेत. तो प्रसंग, लढाया वगैरे कृत्रिमी व्यवहार जाले ते आमच्यानी सहन न जाले. सेवटीं वसईस जाऊन तह केला. पूर्वी वडीलांचे संरक्षण त्यानी केले व पुढे आमचेही

त्याणी मदत करोन अम्हांस सुखाचे हे दिवस दाखवीले. पगडबंदाचे कारणांत सरकारचे किलेकोट मुलुक खंडण्या किती गेल्या व नुकसान किती जाले ते पाहावें बंदोबस्ताचे मागें माहा......किती सुटोन नफा जाला व आमचें न होऊन सुखरूप दगदगीची जात नाहीं. आसे दिवस आम्हीं पाहिले. त्या आर्थे दोस्त ते. आम्हांस सर्वोपरी उद्योग पगडबंदाचा आर्थ असा आहे." त्याचे उत्तर केले कीं "स्वामीशेवेंत गैर......मतो पगडबंद नव्हे तसे......हि पावले. स्वामिप्रतापानें दोस्तासी दोस्ती ते पुन्हां मुस्तकीम जालियायोगें उपयोग सुखाचा व नफ्याचा जाला ते पक्षी ते पगडबंदच आन्य भाव नाहीं." तेव्हां श्रीमंत बोलले, "असो. शास्त्रीबावा तुमचे आमचे बोलखीस फार दिवस जाले. नवी वोलख नाही. त्यास आजचे घटकेपरियंत कांहीं तुम्हांकडोन आपराध दिसोन आलोभ व्हावा आसें जाले नाही. इकडोनही आलोभ नाहीं. उद्याचे गोष्ट सांगवत नाहीं." आम्हीं उत्तर केले कीं "स्वामिचरणीं लक्ष त्याचा आनुभव प्रसिद्धच होता." तेव्हां श्रीमंत बोलले कीं, "तुमचे आमचे चालीचे वहिवाटीस आठरा वर्षे जाली. परस्परे माहीतगारी आहे." इतके बोलणे जालियावर बायाजीनीं इशारा केला माहाराजांची मर्जी आहे कीं अज रात्रौ भोजनास यावें. त्यास तुम्हींच विनंती करावी. त्यावरोन माहाराजाची मर्जी प्रसंन ठेवावी असें समजोन, विनंती केली कीं, "अज पंगतीचे लाभाची इछा आहे." त्यावरोन बसोन श्रीमंत बोलले "उत्तम आहे. भोजन किंवा धान्य फराल कसा सांप्रदाय आहे? त्यांत अज रविवार आहे." आम्हीं उत्तर केले कीं, "माहाराज भोजन कीं फराल करतील तोच लाभ आम्हीं घेऊ. रविवारचा आटकाव या सांप्रदायाकरता आधिक नाहीं. तेव्हां श्रीमंतांनीं सांगितलें कीं, "आपणही भोजनास यावे." त्यावरोन भाऊनीं "आज्ञा मान्य" असें बोलले. नंतर श्रीमंत बोलले "संधेस जावें, सूचना पाठवीन, यावें," असें आज्ञापुन विडे दिल्हे. ते घेऊन नमस्कार करोन सायंकाळीं वाड्यांत आलों, तो मागें माहाराजाचें सनांत आलें कीं, "उभयतां नेत-

नास यावें या भावें मोघम बोलला, तेव्हां शास्त्रीबावा येतील, बापु येणार नाहीत. त्याजकरितां पुन्हा उभयतांनीं यावें ऐसी सूचना करावी," म्हणोन भाऊस व त्रिंबकजीस सांगितल्यावरोन भाऊकडील कारकुन व त्रिंबकजी कडोन नाइकोजी हुजरे येऊन सांगितले. "आज्ञेप्रो येऊं" आसें सांगितलेंवर पांच घटका रात्रीं कारकुन बोलाऊ आल्यावरोन आम्हीं उभयतां शुक्रवारचे वाड्यांत गेलो. भाऊहि आले. नंतर भोजनशालेंत समारंभ पाहतां कोठवर ल्याहावें ? दोन पंगती खांबाबराबर पाट मांडोन पाठीमागें दर दालन सिढ्ये, शागिर्द उभे राहावयास. पंगतींत त्यांचा संपर्क नाहीं. येक वाढणास मात्र फिरावे. रांगोल्या मुकेस घालोन रंगबीरंग पात्राचे दोन्ही बाजूस खांब सुरुदार रंगवल्याचे दर खणास येक पात्र. या प्रो सुरेख रांगोल्या घालोन दोन केलीचीं पाने मोठी मोठी. त्याजवर ताट गुजराथी गजाचे गर्भ्यांची. नव नव वाट्या. त्यांत पदार्थ बारा चौदा शाखा. पंचवीस पर्यंत कोशींबरी दोन भात. दोन पक्वान्ने. समया दर पात्री दोन पाऊण हात उंच. तरह होऊन उत्तरेचे पंगतीस दक्षीणाभिमुख श्रीमंत बसले. डावे बाजुस भाऊ व ऊजवे बाजूस गंगाधरपंत मराठे. समोर दक्षणचे पंगतीस उत्तराभिमुख श्रीमंतासनमुख आम्हीं. आमचे डावे बाजुस गंगाधरपंत मराठे यांचे सनमुख वेोसंपन्न राजश्री बाळशास्त्रीबावा टोकेकर. उजवे बाजुस बापु भाऊसनमुख याप्रो बसोन भोजन होता श्रीमंतांनी स्वमुखे प्रत्येक प्रत्येक सावकाश आज्ञा केली. नंतर गुजराथ प्रांती माहा नद्या कोणत्या ? कोठे कोठे आहेत ? तापी नर्मदा, मही हे सवीस्तर विनंती केली. नंतर आमदाबादेस नदी कोणती ? साबरमती. हीचा उगम व कसीं आली हे बोलणें जाल्यावर श्रीमंतांनीं आज्ञा केली " काय पाहिजे ? " आम्हीं विनंती केली, " सर्व पदार्थप्राप्तीचा लाभ झाला. मागण्याची इछा आहे ती प्रसंगी विनंती करीन." भोजन झाल्यावर ते दिवाणखान्यांत जाऊन बसले. श्रीमंतही आले. नंतर विडे दिल्हेवर पोशाख आणविले. ते स्वहस्ते प्रथम भाऊस पैठणी दुपटा पागोटे दिल्हे. तदोत्तर आम्हांस दुपटा पागोटे हीरवे, पैठणी ऐसी नारली, गजभर

पक्का दुपटा व बलंमपेची पागोटे दिल्हेवर त्रिंबकजीस दुपटा पागोटे पैठणी दिल्हे. नंतर बापूस हीरवें पैठणी दुपटा पागोटे देऊन हार गजरे तुरे मोठे मोटे दिल्हे. नंतर आतर गुलाब लवंग वेलदोडे जायफळ पत्रीची खिचडी मुठभर दिल्ही. वर निरोप दिला. नमस्कार करोन आज्ञा घेऊन आकरा घटका रात्रीं वाड्यांत आलो.

77]

Gangādhar Shāstri's diary of his misson at Poona. He says in effect, "I went to wait on Bājirāo Peshwa with Bāpu Mairāl, Bāpāji Arcotkar and Jivanrāo to the Shukrawar palace. I was ushered into the Peshwa's presence by an officer of Trimbakji Dengle. Clothes of honour with a pearl necklace were presented to the Peshwa and a parley followed at which the Peshwa, Sadāshivrao Mānkeshwar, Dengle, Bāpu Mairāl and myself only were present. Mānkeshwar addressed the Peshwa on my behalf expressing my pleasure in securing the Peshwa's audience after 14 months' waiting in Poona. Bājirāo said that the delay was due to the Company's insistence that their representative must be present at the time of the audience. After some more conversation of a formal nature in which the Peshwa referred to the protection he received from the British and to his long-standing knowledge of my work, he invited me to dinner at night. I went as invited. The magnificence of the table defies description. Bāpu Mairāl and myself received presents of dress of honour and garlands before we took our leave."

N. B. This page from the Shāstris' diary gives a vivid sketch of Bajirāo's sentiments as well as the splendour of his table. This was the only occasion when the Shāstri met the Peshwa personally during the mission.

---

78] [3-4-1815

संवत १८७१

श्री.

रोजनिशी स्वारी पुणे सन खमस अशर मयातेन व आलफ माहे राखर, फाल्गुन मास छ २२ वा। ९ सोमवार. पावणे दोन प्रहरा आम्हीं व बापु ऐसे बंगल्यास गेलो. दस्तुर माफक मुलाकात होऊन थोरले बंगल्यांत सो व पातजल सो व आम्हीं उभयता बसोन परस्परे तबियत खुशीचे बोलणे जाल्यावर बोलणे. कलम.

१. आम्हीं छ २१ रोजी त्रिंबकजी डेंगले यांस बोलणे जाहले. नंतरी राजश्री भाऊकडे आम्हीं व बापु जाऊन बोलणे जाहले छ २१ रोजी श्रीमंताकडे जाऊन भेट होऊन वस्त्रे देऊन बोलणे जाहले व रात्रौ भोजणनास आज्ञेप्रा। गेलो भोजणन जाहल्यावर वस्त्रे दिल्हीं. ते सवीस्तर सो यांस श्रुत केले......कलम

२. वर्तमान ऐकून साहेब बोलले कीं यात मला फेसला होईल असा फायदा दिसत नाहीं कारण गोडीगुलाबीचा गप्पात हात घालोन दिवसगत काढावी हा विच्यार दिसतो. त्याचे दिलात कामाची दरकार असती तरी भडोच वगैरे कलमाची जीकीर निघती तरी फेसला होईल असे नजरेस येते......कलम

३. आम्हीं पुसले भेटीचा क्रम होता तो झाला, पुढें बोलावे असी त्याची मनीषा त्यास येवीसी पूर्वी साहेबी मला सांगितली कीं आम्हीं निरोपाचे बोलत आहो. आमची सला दिसो न देता फेसला कसा करतात हे पाहवे. आतां तो प्रसंग आहे. पकेपणी सला असल्यास बोलतो. तेव्हां बोलले ठीक आहे, बोलावे परंतु दिवसगत लाऊन वर आम्हीं चार दिवस तुमचे रजेची जिकीर बोलत नाहीं कारण कीं आम्हीं हरवकत बोलतो ते घडत नाहीं. तेव्हां त्यास असें दिलात येईल कीं उगीच जीकीरी दाखवितात परंतु करू सकत नाहीं व तुम्हाकडील बोलण्याचा करार कसा ठरतो ? नंतर आम्हीं सांगु कीं तुमचे त्याचे बोलणे बोलत होते हे ऐकोन बहुत खुषी जाहली कीं आम्हांस मेहेनत न पडता आपसमधें फेसला साफ होईल. त्यास तो करार दिलगुजारीवर दिसतो. तेपक्षी आतां त्यास रुसकत देतो. तुम्हीं ऐसे बोलावे कीं जलदी तुम्ही लांबणीचा (?) धरू नये. आम्हीं बोललो सो सला त्या बेमानी हा करतो (?) कलम

४. साहेब बोलले कीं श्रीमंताचे बोलण्यांत तुम्हांस दिवस लागले यांत मोदीची हरकत. त्यास, मोदी कामात फारसे नवते व आम्हीं रूबरू श्रीमंतासी बोललो व कामातही त्याचे माहात्म्य नवते हे श्रीमंत जाणत असता मोदीचे हरकतीचा शक धरणे लाजीम नाही. आम्हीं जबाब दिल्हा कीं आपण बैठकीत जबाब दर्शवीले परंतु नेहमी त्याची बोलणी वागणी त्याजवरून आपले बोलणे मुकरर व मनात आले नाहीं असें वाटते. साहेब बोलले कीं आतां बयान लागतो. रुजुवात होण्यास जागा नाहीं......कलम

५. भगवंतराव आपले ठिकाणीं दिलगीर जाहले कीं, आतां आमची गत काय ? त्याजरून त्याचे येणेचे संधान लागले. आम्हीं कांहीं येथे न येणेचा करार करून दिल्हा नाहीं. ह्यावीसीं सला काय ? तेव्हां

विचारून साहेब बोलले कीं त्याजला भानगड करून आणावयाचा दरकार नाहीं. का म्हणाल तरी भानगडीने आनले तरी जाहीर होईल कीं त्याची सला करून आणिले व पेशवे दिलात हवाली करण्या बा आदेश ठेवीतात तो तुटेल. सबब बोलणे करून आणू नये. तेच उठोन जर आले तरी मग येथून बडोद्यास खावंदास लीहून त्याचा जबाब येईल तसे करावे. परंतु येसे खलेल माणसाचा बंदोबस्त ठेवित असावा हे लाजीम. आम्हीं जबाब दिल्हा कीं, यावीसी खावंदाची हुषारी कम नाहीं ज्यांत बंदोबस्त काय करावा तेच च्याहतात.......कलम.

६. साहेब बोले कीं, पेशवे सरकारचे दिलांत "गायकवाड सरकारची खावंदगिरी आमची, ते नोकर, त्या दवलतीला आपला बंदोबस्त असावा" हे च्याहतात. त्यास हे आम्हांस तहनाम्याचे रूईने मुनासफ दिसत नाहीं. गायकवाड दौलत आमद पैका फौज देणेचा सिलसिला यवढाच वरकड अर्थ नाहीं. त्यास तुम्ही त्याच घोरणानी बोलावे.

७. साहेब बोलले, फसला होईल कीं नाहीं हे तुमचे नजरेस कसे येते? मला खातरजमा वाटत नाहीं. आम्हीं जवाव दिल्हा कीं, आम्हांसही भरवसा येत नाहीं का कीं त्याचे दिलात च्यार कोट आहेत. त्यात चौथाई कोट तरी येतील परंतु आम्हांस ताकत नाहीं. बालीबा म्हणताल त्यापेक्षी दौलतीचा अहवाल बोलत आलो तो स्पष्ट बोलु. दुसरे पेशवे सरकारचे दिलात भडोचे वगैरे तंटे काढून दिवसगतीवर न घालावे व सूट देऊन मोघम आर्थ ठरवावा. त्याजवर सो॥ बोलले, हेही चांगले परंतु पुढे सालाबाद मुक्रर कसे होईल? आम्हीं जबाब दिल्हा कीं आम्हांस हाच मोठा आदेश आहे. बोलणेत भाव दिसेल तसे साहेबास कलवीन. सो॥ सल्ह्या माफक पुढे विच्यार....कलम.

सदरहु प्रो॥ बोलणे होऊन निरोप घेऊन सहा प्रहरी वाड्यांत आलो.

78]

Gangādhar Shāstri's diary for 3-4-1815. He writes that, he told to Elphinstone the account of his visit to Bājirāo II in detail on which Elphinstone said that the Peshwa simply wanted to put off business with his glib tongue. Elphinstone gave instructions to the Shāstri about future negotiations, absolved Modi from the Peshwā's charge of his being an obstacle to negotiations, and asserted that the Peshwa could no longer claim sovereignty over the Gāikwād in the light of the treaties. Both Elphinstone and the Shāstri thought the no decision was likely to be arrived at about the mutual claims of Poona and Baroda in the near future.

---

79] [21-4-1815

श्री.

*तीर्थस्वरूप राजेश्री बाबासाहेब पटलादथी ली. कीसोरदास सामदासनो* दंडवत विदनापना जे साहबश्रीनो पत्र पोहेतो वांची समाचार जाणे. आजम लारड साहबनुं मुकाम मोजे देवे ता. पेटलाद थवानुं ते सारू घासलकडी तैयार रखावजो ए रीते तमारो जवाप लईने अस्वार आवो तेज वखत जमादार विभाजीने मोजे देवे मोकला छे वासते वेरण ता. लकडी ता. वासण ता. मेखो साहेबश्री आगना करसो ते परमाणे अपावसे ता. माखण ता. दुध ता. सीधुपण करावुं छे ते आपवुं घटे ते परमाणे अपावजो. *साहेबश्री अगना करसो ते प्रमाणे करसे. बीजु मोजे गाजणाना आरानुं लखु*

ते नदीनुं काम छे ते कोईक वखतनी हार आवे तारे आरो बगडे ता. कोई वखतनी हार आवेने आरो बगडेलो होओ तोए ते आरो समरवासते हरघडी ए आरो साहेब लोकोने जवा आवानो मारग छे ता. कोसनुं लखुं ते श्री पेटलादथी मोजे गाजणा गऊ ११ थाअ ते जाणवुं. बीजु आरे उतार होअ तो पगथीआये उतरे ता. पाणी वधतु आवु होअ तारे होडी उपर उतरे ए प्रमाणे अहींना जनार आवनार हता. तेहेने पुछु तारे तेणे उपर लखाप्रमाणे कहुं ते परमाणे विनंती लखी छे. बीजु पटलाद घासलकडी एकठी करावी छे ने मुकामे श्रीरामनाथ उपर थसे. बीा सहवाश्री मोजे दवा अवो तर पटलादज मरगा आवनुं होअ ता. मरग लखजो जते वखत समा अवुं सं. १८७१ चईतर शुद्ध १३ अविदनअपन.

79]

Letter to Fattesingrão (Regent) from Kisordās Shāmdās of Petlād who promises to supply as directed grass, fuel and other necessities to a European grandee (not named but called Lord Sāheb), about to halt at Deva, in Petlād taluka.

---

80] [25-4-1815

श्री.

वडीलाचे शेवेसी आपत्ये भिमाशंकरराव चरणारविंदी सा। विज्ञापना. येथील कुशल ता। चैत्र वा। २ मंगलवार पे। मु। बडोदें येथास्थित असो. विशेष आपण श्रु। पौर्णिमेची पत्रे दोन येक पोष्टात व येक सांडणीस्वार यांज समागमे चिंचेच्या मुरंब्याचे बरणीसह पाठवीली ती रोज गु। पाऊन सवीस्तर कलवुन बरणी हुरमसजीकडे पावती केली. इकडील मा। पुण्याहून

रोज गुा लाखोटा सरकारचा आला त्यांत मार मिळोन नरसिंगराव घोरपडे पुण्यास येता जेजुरीस आल्यावर पुण्यातील त्याचे अप्तानी कांहीं भासऊन लीहील्यावरोन परत हिंगणी पुण्याहून वीस कोस येथें जाऊन टील्याचा वगैरे वांधा घेऊन बसले आहेत. व कीतीक अडचणीची बोलणी बोलतात. येथोन अजम चापलीन सोवर पत्र घेऊन पाठवीले होते. त्याणी घोरपडे याजकडे स्वार पाठवीला आहे कीं तुम्हीं यावे. तसे रा जीवनराव दिवाणजी व सदोबामामा यांस बाबा पुरंदरे मध्यस्त आहेत ते घेऊन जाणार. बोलण्यांत येऊन तीथ अटोपे असे येण्याचे करीतो म्हणोन श्रा ९ चे पत्रीं लीा व रा राघो भिवराव दिा याणी पुजाराधान श्रा १५ स करावयाचे सबब कारभारी दरकरदार यास पुण्याहवाचन समयीं बोलावील्यावरोन जाऊन आहेर करून आले. आपले कडील आहेर पंचवीस रुपये आल्याप्रो केला. दादा पुण्यवान. अम्ही यावयास कांहीं आवकाश जाला नाहीं. नंतर रोज गुा बायकास सदरहुप्रो हलदीकुंकाची अमंत्रणे अली होती. आपलेकडील पुतली अम्ही पुढें ठेवीली, व वो सदाशिव भट पुराणीक याचे स्त्रीचे गरभादान बाा वीस रूा आहेर केला. वरकड दरबार सांप्रदायाप्रो होत आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

रा रामराव मल्हार व रामचंद्र चिंतामण कृतानेक सां नमस्कार विज्ञापना काठेवाड प्रांतीचे वर्षासनावीसी बोलत आहो. तसे रा गोविंदराव देवाजी आले आहेत त्यासही विचारीले. सांगितलेले कीं आता थोडे दिवसांत देवितो. अजम रीसीदेंटसो मुमईस जाणार त्यांवरोन अजम मीरसो कधी जाणार म्हणोन विच्यारीले. अवकाश आहे म्हणोन सांगितले. अजम साहेबाकडे श्रीमंत यजमान त्रीवर्ग परवा गेले होते. पुन्हा जातील. ते समई बराबर उभयतास नेण्यावीसी अर्ज करतील. इतक्यांत आपणही येऊन पोहोचाल. श्रीमंत रा दिवाण सो यास पागेच्या चिठ्यावीसी सूचवित आहे व मीरसोसही सूचना करण्यावीसी बोललो आहे. वरकड मार

यजमान पत्रावरोन व राजश्री आबाचे पत्रावरोन कलेल. श्रुत होय हे विा.

80]

Letter from Bhimāshankar to his father Gangādhar Shāstri reporting some events of local importance.

---

81] [21-5-1815

पो छ १६ जमाखर सन खमस आशर.

श्री

राजश्रीया वीराजीत राजमान्य राजश्री दिवाणजी साहेब यांस,

पो यशवंतराव बापुजी गोडबोले व यशवंतराव बापुजी मराठे कृतानेक आसींर्वाद विनंती येथील क्षेम् ताा वैशाख शुा १३ रवीवासर पावेतो वर्तमान यथास्थित असे. विशेष आपण छ. १ जमादिलाखरची पत्रे व छ. ७ मिनहूची पत्रे च्यार च्यार रोजाचे वाईद्यानी पाठवीली ती अनुक्रमे मुदतीस पावली. प्रथम आपण छ २८ जावलची पत्रे पाठवीली ती वायदाप्रमांणे पावली होती. त्याची उत्तरे तेंच दिवसी रात्रौ लिहून नऊ दिवसांचे वायद्याने पाठवीली ती पावलीच असतील. अलीकडे पत्रे राजश्री बज्याबादादा याणी लिहून ठेवीली होती परंतु एक दोन दिवसाचे गुंत्यांत आपलेकडे न आली. हाली आपण पत्रे पाठवीली त्यांत बहुत उदासीनतेचे वगैरे पर्याये करून लिहीले त्यास सविस्तर मजकुर श्रीमंतास आजच श्रुत केला व अजम उलीयम साहेबासही सविस्तर समजावीला. त्यांजवरून सरकारी पत्र खातरजमेचे आपले नांवचें व अजम ऊलीयम साहेबाचेही पत्र

आपणास घेऊन पाठवीले आहे. त्याजवरून सवीस्तर ध्यानास येईल. सारांश आधीर होऊं नये. सरकारचाकरीवर लक्ष ठेऊन नक्ष राहावा. आपण पत्री पंचवीस रोज पत्रे येत नाहीत म्हणोन लि॥ त्यास माहे मा॥री दोन रवानग्या आलीकडे आजच्यासुधा आल्या. त्याची उत्तरे मात्र आपणाकडे आली नाहीत. वरकड पत्रे वरचेवर कचा मा॥र लिहून पाठवीतच असतो. पुण्याकडील वर्तमान तर वडील सोाची स्वारी श्रा॥ २ गुरूवासरी निघोन नासीकास जावयाकरितां प्रस्थानी जाऊन त्रीतीयेस आलंदीस मुकामास गेले. पुढे दरमजल जाणे आलेच असेल. वांईहून परभारे श्रीमंताची स्वारी नासीकास जाणार तसे राजश्री सदाशीवपंत भाऊ व त्रिंबकजी तात्या व अजम ईलफीष्टन सोाही निघोन गेले. तेथे पावलीयावर कचे वृत्त लिहून आले म्हणजे लिहून पाठऊ. आपली पत्रे पाच येऊन इकडोन जाब न पाठवावा असे घडले नाहीं. परंतु कासीदास मार्गीत कांहीं जाले किंवा पत्रें कोणाचे हाती लागली हा मात्र आंदेशा येतो. याची चोकसी करावी. वरकड आपण लिहीता यातील पर्याय. सरकारांत किंवा सोाकडे आजपावेतो कांहीं नाहीं. दरम्यान असे बेआबरूचे व्यवहार होतात त्यापेक्षा समक्ष असल्यास हमेशा कटकट वाढेल. याजकरितां फौजेत रा॥ गोविंदराव यांस ठेऊन त्याजला सांगुन आपण आमरेलीस निघोन यावे. इतक्यांत याचा बंदोबस्त रीसीदेट सोाचा जाब येऊन होणे तो होईल असे आपणास ल्याहावे असी कल्पना येथे जाली होती परंतु हरयेक कामांत सबुरी करणें ही मोठी आकलेची गोष्ट असी शाहाणें पोक्त याची सीक्षा सा॥ न लिहीले. तसे उत्तरे प्रत्योत्तरे वाजवी कामावीसी करणे ती स्वछच व्हावी, तक्रार होणें या पल्यास गोष्ट येणारच नाहीं. आपण मुले माणसे याची रवानगी इकडे करण्याचा त्रेताची जलदी न करावी. बंदोबस्त लोकरच होईल. भवीष्यानुरूप दगडाखाली हात सापडला तथापी युक्तीने काढला पाहिजे. हीसकणे योग्य नाहीं. कुमकेस पलटणें २ व गोरे व तुरक स्वार व तोफा याप्रो॥ आपलेकडे रा॥ करण्यावीसी रीसीदेट सोाचे पत्र आल्यावरोन ऊईलम सोानी

तेथील आसीष्टन सो रीसीदेंट सोचे यास लीहीले आहे आणि आपणास ल्याहावयास आम्हांस सांगीतल्यावरोन लीहीतो. साहेबीही आपले पत्रीं लिा आहेच त्याविसी आपल्यास मसलत पुसतील ती नेक द्यावी. येथें श्रीमंतानी साहेबास सांगितले कीं, "कुमक बडोद्यावीसी तुमचें सरकारची घेणे पडल्यास दिवाणजीस लिहून आणऊन मसलत करून सांगू. आमचे सल्यासीवाय तर तुम्हीं आणणार नाहींच तसें दिवाणजीसी सलेगार रीतीभातीने चालत नाहीं. याचा बंदोबस्त परिछीन्न करावा." याप्रो सांगीतले ते वेलेस तर, "अजम मेकमर्डो सोचे पत्रावरून जत व वागडचाल्याचे धाडीचे तोंडावर पाटडीकडे पलटणे जातात," असे उईलम सोनी श्रीमंतास उत्तर दिल्हे व ठरलेही होते. नंतर रीसीदेंट सोचे पत्र आल्यावरोन हाली असे योजनेत आले. कलावे. वरकड येथील वृत्त रा बजाबादादा कचे लिहीता कलेल. दिवाण साहेब ! आपणास आम्हीं किती ल्याहावे ! सर्व ध्यानातच आहे. वरकड आपले लिाप्रो सरकारांत व साहेबास श्रुत करून लिहून पांठवीत आहोच. बहुत काय लिहीणे ! लोभ करावा हे विज्ञापना.

81] Letter from Yeshwantrāe Godbole and Yeshwantrāo Marāthe, to Vitthalrāo Devāji. The writers advise Vitthalrāo not to feel melancholy and forward reassuring letters from Fattesingrāo and Williams. News from Poona is given to Vitthalrāo as follows :— The Shāstri has left Poona for Nāsik to join the Peshwa who is proceeding from Wāi direct to the same place. Sadāshivpant Bhāu, Trimbakji Dengle and Elphinstone have also left Poona. The writers suspect some misunderstanding on the part of Vitthalrāo for dispelling which they explain *that* they had thought of writing to the Resident and of



भीमाशंकर गंगाधरशास्त्री पटवर्धन. पा. १४९.

Bhimashankar, son of Gangadhar Shastri; P. 150.

asking Vitthalrāo in the meanwhile to station himself at Amreli. But on second thought they came to the conclusion that Vitthalrāo should not be impatient. They inform him that reinforcement is coming to him in the form of two battalions and guns as ordered by the Resident and that the Regent also has spoken to the Resident about consulting the addressee and the Baroda Government in military matters in Kāthiāwād.

---

82] [9-9-1815

नकल.

श्रीम्हालसाकांत

राजश्री भीमाशंकर गंगाधर गोसावी यांस,

अखंडीत लक्ष्मी अलंप्रत राजमान्य स्नो अनंदराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादर दंडवत सुमा सीत अशर मयातेन व अलफ. तुमचे तीर्थस्वरूप गंगाधर कृष्ण मुतालीक सरकारचे कामास पुणीयास गेले होते त्यास श्रीपंढरपुरचे मुकामी दगा होऊन काल जाला म्हणोन कलले ही गोष्ट बहुत आनुचीत जाली. असो होणार गोष्टीस उपाय नाहीं. तुम्हीं या गोष्टीचा खेद करूं नये. तुम्हांस इकडे आणावयावीसी राजश्री बापु मेराल यांस पत्र लीहीले असे तरी तुम्हीं तेथील सरंजामसुद्धां निघोन येणे. तुमचे तीर्थरुपाचे मुतालकीचे कामाची सनद तुमचे नांवे येथें करून ठेवीली आहे. तुम्हीं येथे आलीयावर वस्त्रे व सनद देऊन काम काज पेशजी प्रमाणे चालवीले जाईल. तुम्हीं कोणे गोष्टीची कालजी न करणे. जाणीजे छ ३ माहे रमजान मोर्तब सुद.

82]

Copy of a letter of condolence on the murder of Gangādhar Shāstri to his son Bhimāshankar from Mahārāja Anandrāo, who assures the addressee that the post of mutālik (Deputy Regent) held by the Shāstri will be conferred on him on his reaching Baroda.

---

83] [ 20-9-1815

नकल

पोा मा वा ११ सा १८७१

श्री

रोजनीसी स्वारी पुणे. सुमा सीत अशर मयातैन अलफ माहे सवाल भाद्रपद मास छ १६ रोज वा २ सोमवासर सायंकाल आम्हीं व बापाजी ऐसे बंगल्यास सोकडे गेलो. आतील बंगल्यांत दस्तुर माफक मुलाकात होऊन साहेब व आम्हीं उभयता बसोन परस्परे तब्रीयत खुशीचे प्रश्न होऊन नंतर बोलणे...कलम.

१. साहेब बोलले कांहीं खबर ऐकीली की काय? त्यांचे उत्तर केले कीं चिमणाजी नारायण प्रातःकालचे प्रहर दिवसास येथें आले. सोमवारी पोटसोाचे पलटणांत हीकसो आहेत. त्यांचे हावाली त्रिंबकजीस करोन नंतर हे तेथुन निघोन आले म्हणून कलले. तेव्हां सो बोलले आज भाऊकडील इशारा आला होता कीं मंगळवारी प्रथम प्रहर दिवसास चिमणाजी नारायण यांणी त्रिंबकजीस हीकसोचे हवाली करून हीकसो

यांची पोहच आणीली आहे. आम्हीं बोललो कीं आपणास हीकसोचे पत्र आलें कीं नाहीं व पोहच आणली ते आपणाकडे दाखवावयास पो होती कीं नाहीं? तेव्हां सो बोलले पत्रही आले नाहीं व पोहचही पाहाण्यास आली नाहीं. आम्हीं बोललो कीं आपले पत्र जलद यावे ते कां न आले? तेव्हां साहेब बोलले भाऊकडील इशाऱ्यांत कीं नारोपंत आपटे आगोधरच कील्यावर गेले होते. त्यांचा निरोप हीकसोस आला कीं तुम्हीं दोन कंपन्या पाठऊन द्याव्या. कील्याच्या दरवाज्याजवळ त्रिंबकजीस हवाली करीतो. त्यावर हीकसोनी सांगून पाठवीले कीं आम्हीं माणसे कील्याजवळ पाठविणार नाहीं. तुम्हीं आमचे लष्करांत पावते करावे. येणेप्रो नीरोप आल्यावरून त्रिंबकजीस म्यान्यात घालून लष्करांत आणून हवाली केले आणी तेच क्षणी त्याणीा तेथुन कुच केले. येणेप्रमाणे सांगून पाठविले. त्यावरोन आंदेशा वाटतो कीं हीकसो कुच्याच्या गडबडीत. यामुले त्यास पत्र पाठवावयास फावले नसेल. मुकामी आल्यावर पत्र पाठवीतील. त्यास पत्र यावयास आवकाश पडला. उदेला पत्र येईल. आम्हीं उत्तर केले कीं चिमणाजी नारायण आठ प्रहरांत पन्नास साठ कोस जलद परत आले. तेव्हां साहेब बोलले हे अगोदर निघाले आसतील. पत्र व ते तेथे बराबर पावले असतील. आपले पत्र आले म्हणजे सविस्तर समजेल...कलम.

२. आम्हीं बोललों कीं भगवंतराव व बंधुजी प्रकर्णी काय ज़ाब आला? सो बोलले आला कीं हवाली करतो परंतु एक दोन रोज जलदी करू नये कारण उभयता माणसें शिपाई वगैरे आहेत त्याजपासोन अलग केले पाहीजे. त्याचे कांहीं देणे घेणेंही आहे. येवीसी गोखले यास सांगीतले ते साफ करतील म्हणजे माणसे आलग होतील. नंतर हवाली करू. परंतु यांचे जिवास भय, गायकवाड याजपर्यंत पोहचत तो होऊ नये. याचे उत्तर आम्हीं सांगून पाा कीं शिपाई वगेरे आलग करोन आमचे हवाली करणार. ठीक आहे. जीवाचे भयाचे तर आमची खातरजमा

82]

Copy of a letter of condolence on the murder of Gangādhar Shāstri to his son Bhimāshankar from Mahārāja Anandrāo, who assures the addressee that the post of mutālik (Deputy Regent) held by the Shāstri will be conferred on him on his reaching Baroda.

---

83] [ 20-9-1815

नकल

पो। मा। वा। ११ सा। १८७१

श्री

रोजनीसी स्वारी पुणे. सुमा सीत अशर मयातेन अलफ माहे सवाल भाद्रपद मास छ १६ रोज वा। २ सोमवासर सायंकाल आम्हीं व बापाजी ऐसे बंगल्यास सोकडे गेलो. आतील बंगल्यांत दस्तुर माफक मुलाकात होऊन साहेब व आम्हीं उभयता बसोन परस्परे तब्रीयत खुशीचे प्रश्न होऊन नंतर बोलणे...कलम.

१. साहेब बोलले कांहीं खबर ऐकीली की काय? त्याचे उत्तर केले कीं चिमणाजी नारायण प्रातःकालचे प्रहर दिवसास येथें आले. सोमवारी पोटसोचे पलटणांत हीकसो आहेत. त्यांचे हावाली त्रिंबकजीस करोन नंतर हे तेथुन निघोन आले म्हणून कलले. तेव्हां सो बोलले आज भाऊकडील इशारा आला होता कीं मंगळवारी प्रथम प्रहर दिवसास चिमणाजी नारायण यांणी त्रिंबकजीस हीकसोचे हवाली करून हीकसो

यांची पोहच आणीली आहे. आम्हीं बोललो कीं आपणास हीकसाचे पत्र आले कीं नाहीं व पोहच आणली ते आपणाकडे दाखवावयास पो होती कीं नाहीं ? तेव्हां सो बोलले पत्रही आले नाहीं व पोहचही पाहाण्यास आली नाहीं. आम्हीं बोललो कीं आपले पत्र जलद यावे ते कां न आले ? तेव्हां साहेब बोलले भाऊकडील इशाऱ्यांत कीं नारोपंत आपटे आगोधरच कील्यावर गेले होते. त्यांचा निरोप हीकसास आला कीं तुम्हीं दोन कंपन्यां पाठऊन द्याव्या. कील्याच्या दरवाज्याजवळ त्रिंबकजीस हवाली करीतो. त्यावर हीकसानी सांगून पाठवीले कीं आम्हीं माणसे कील्याजवळ पाठविणार नाहीं. तुम्हीं आमचे लष्करांत पावते करावे. येणेप्रो नीरोप आल्यावरून त्रिंबकजीस म्यान्यात घालून लष्करांत आणून हवाली केले आणी तेच क्षणी त्याणी तेथुन कुच केले. येणेप्रमाणे सांगून पाठविले. त्यावरोन आंदेशा वाटतो कीं हीकसो कुच्याच्या गडबडीत. यामुळे त्यास पत्र पाठवावयास फावले नसेल. मुकामी आल्यावर पत्र पाठवीतील. त्यास पत्र यावयास आवकाश पडला. उदेला पत्र येईल. आम्हीं उत्तर केलें कीं चिमणाजी नारायण आठ प्रहरांत पन्नास साठ कोस जलद परत आले. तेव्हां साहेब बोलले हे अगोदर निघाले आसतील. पत्र व ते तेथे बराबर पावले असतील. आपले पत्र आले म्हणजे सविस्तर समजेल...कलम.

२. आम्हीं बोललो कीं भगवंतराव व बंधुजी प्रकर्णी काय ज़ाब आला ? सो बोलले आला कीं हवाली करतो परंतु एक दोन रोज जलदी करू नये कारण उभयता माणसें शिपाई वगैरे आहेत त्यांजपासोन अलग केले पाहीजे. त्याचे कांहीं देणे घेणेंही आहे. येवीसी गोखले यास सांगीतले ते साफ करतील म्हणजे माणसे आलग होतील. नंतर हवाली करू. परंतु यांचे जिवास भय, गायकवाड याजपर्यंत पोहचत तो होऊ नये. याचे उत्तर आम्हीं सांगून पा कीं शिपाई वगैरे आलग करोन आमचे हवाली करणार. ठीक आहे. जीवाचे भयाचे तर आमची खातरजमा

नाहींसी वाटते परंतु आमच्या चाली आशा नाहीत. नंतर साहेब बोलले असाही त्यांचा इशारा आला होता कीं आम्हीं गो॥ यांस पत्र देतो त्यांत लीा॥ कीं तुम्हांकडील सरदार आला होता त्यास इंग्रजाचे विद्यमाने तुम्हां-कडे पा॥ आहे. येणेप्रा॥ लीहून हुजऱ्याबराबर पाठवीतो व तुम्हीं ही सरदारी डोलाने त्यांस मार्गस्त करावे यावर सांगून पो॥ कीं सरदारी डोलाने पाठ-वावे व आपणही पत्र लीहावे अशी त्यांची कर्मे नाहीत. येणेप्रा॥ उत्तर प्रत्योत्तर जाली. नंतर आम्हीं बोलले कीं, आम्हीं ऐकीले कीं, गोपाळ-याची माणसे बंधुजीकडे दाहा होती व भगवंतराव यांजकडे वीस होते, ते आज त्रीतय प्रहरी बंधुजीकडे आणखी दाहा माणसे व भगवंतराव यांजकडे दाहा माणसे गेली. त्यानी उभयतांजवळ जी माणसे होती ती काढून दिल्ही. येक येक खिजमतगार मात्र जवळ आहे. येणेप्रा॥ ऐकीले. तेव्हां सो॥ बोलले आम्हास तर त्यांणी सांगून पो॥ कीं यास दोन दिवस लागतील. आम्हीं बोलले आसा मोठा बखेडा आहे कीं दोन चार दिवस लागतील...कलम.

३. सो॥ बोलले बडोद्याची काय खबर आहे ? आम्हीं बोललो नवीन नाहीं. सो॥ बोलले सिताराम याचा बंदोबस्त झाला कीवा नाहीं ? आम्हीं बोललो लौकरच होईल...कलम.

४. आम्हीं बोललो कीं, त्रिंबकजीकडे मामले वगैरे होते पो॥ काढून दुसरेकडे सांगीतले.

१ वासोटा कीला वामनराव आपटे यांजकडे सांगीतला,

१ रायगड नारोबा आपटे यांजकडे सांगीतला,

१ कीले सातारा येथील बंदोबस्त नारो विठ्ठल आपटे यांजकडे सांगीतला.

---

३

येणेप्रमाणे ऐकीले. तेव्हां सो॥ बोलले आम्हांस कळले नाहीं...कलम.

सदरहु बोलणे बोलून नीरोप घेऊन तीन घटका रात्रीं लष्करांत आलो.

83]

Copy of Bāpu Mairal's diary for 20-9-1815 :—
" With Bāpāji saw Elphinstone at his bungalow as usual. Elphinstone told me that Chimnāji Nārayan had handed over the person of Trimbakji to Mr. Hick in the English Camp. I asked Elphinstone as to what reply was received from the Peshwā about the surrender of Bhagwantrāo and Govind Vishwanāth (Bandhuji.) He said the Peshwā wanted them to be sent in dignity to the Gāikwād as sardārs to which he (Elphinstone) did not agree. Then I informed Elphinstone that Sitārām Rāoji would be put under restraint shortly and that the three forts managed by Trimbakji were reported to have been put under the charge of new mamlatdars."

---

84] [24-9-1815

पो॥ आसवीन शु॥ १ सां॥ १८७२ नकल

श्री

रोजनीशी स्वारी पुणे सुमा सित अशर मयातेन व अलफ माहे शवाल भाद्रपद मास छ २० रोज वा॥ ६ रविवार साहा वाजतां सोकडे बापाजी गेले होते. आंतील बंगल्यांत सोची मुलाकात होऊन उभयता बसोन बोलणे...कलम.

१ सो बोलले, "भगवंतराव यांस बराबर येक वाजतां पाठऊन दिल्हे. आम्हीं तेंच क्षणी कर्नेल स्मितसो यांचे कापात पावते केले. नंतर त्रीतीय प्रहरीं बंधूजीस बालाजीपंत गोखले घेऊन आले. त्याजलाही कर्णेलसोकडे पावते केले, तुम्हांकडे उभयतास वोलखावे म्हणोन इशारा केल्यावरोन तुम्हीं माणसे पो. त्यांणी ओलखीली कींवा कसे ?" बापाजी बोलले आमचे माणसांनीं ओलखले. उभयताही खरे आहेत, अशी उघड लबाडी करणार नाहींत. नंतर बापाजी बोलले कीं, गोखले काय बोलले व उभयता आपले रूबुरू आले होते कीं नाहीं ? सो बोलले गोखले येऊन इतके मात्र बोलले कीं, श्रीमंतांनीं या उभयतास आपणाकडे पाठविले आहे. रूबुरू आणावयाची मर्जी आहे कीं काय ? आम्हीं उत्तर केले कीं रूबुरू बंदीवानास भेटणे आम्हांस लाजम नाहीं. इतके बोललो पुढें ते क्षण येक बसून इकडील तिकडील गोष्टी बोलून नंतर ते गेले......कलम.

२ बापाजी बोलले कीं हीकसोाचा मुकाम कोठपर्यंत आला ? सो बोलले कीं, जेजुरी पलीकडे दोचार कोसावर होता. आज दरम्यान येतील. व परवा लोणीवर जाऊन खराडीस येतील. तेथें मुकाम होईल. नंतर प्रातःकाली ते त्रिंबकजीस नदीपलीकडे आणून होडीत बसून आलीकडे आणतील. तेथें कर्णेल सोाकडील पलटणे व तुरकस्वार येक तोफ ऐसी जाऊन आगोधरच उभे राहतील आणि त्रिंबकजीस स्वाधीन करोन घेऊन चिंचवडास मुकामास जातील. भगवंतराव बंधूजीसही समागमेच मुकामास घेऊन जातील...कलम.

३ सो बोलले, आमचे येथें मेजरसो आहेत त्यांचे हवाली उभयतास आम्हीं केले. त्यांणी कर्णेलसोचे हवाली केले. त्यास मेजरसो

सांगत होते कीं, भगवंतराव यांचा चेहरा फार उतरला होता व बंधूजी हुशार होता. बापाजीनी उत्तर केले कीं, भगवंतराव याची उमर कम व त्याणे कांहीं पाहिले नाहीं. बंधूजीचे बुद्धीने खराब जाला. वरकड त्याची बडोद्यास सोय फार चांगली होती. परंतु दैवगतीस उपाय नाहीं. यामुळें त्यांस वाईट वाटले असेल. बंधूजी याचा स्वभाव बखेडेखोर ते पक्षी ते कशास क्षीत मानतील ?....कलम.

४ सो बोलले, येथें तर हे कृत्य केले. परंतु सितारामाचा बंदोबस्त जाल्याचे पत्र आले कीं नाहीं ? बापाजी बोलले एक दोन रोजी येईल. सो बोलले, या गोष्टीस फत्तेसिंगराव बाबासो यांचे मनांत कांहीं शंका आहे कीं काय ? बापाजी बोलले शंकाचा अर्थच नाहीं. बंदोबस्त जालाच असेल. तो लौकरच समजण्यांत येईल...कलम.

सदरहु बोलणें होऊन निरोप घेऊन लष्करांत आम्हांजवल येऊन मार सांगीतला.

84]

Copy of the Diary of the Poona mission :—Bāpāji Arcotkar interviewed Elphinstone when the latter said, " Bhagwantrāo and Bandhnji were handed over to Colonel Smith. Did your men identify them ?" Bāpāji replied, " yes." Elphinstone then acquainted Bāpaji with the movements of the men in charge of Trimbakji's person. Elphinstone was anxious to know whether Sitārām was put under restraint at Baroda, but Bāpāji could not give a definite reply for want of a report from Baroda.

85] [25-9-1815

नकल

पो। आश्वीन शुा ३ सा १८७१.

श्री.

रोजनीशी स्वारी पुणे सुा सुमा सित अशर मयातेन व अलफ माहे सवाल भाद्रपद मास छ २१ रोज वा। ७ इंदुवासर सहा वाजतां बापाजी सोबाकडे बंगल्यास गेले. आंतील बंगल्यांत मुलाक़ात होऊन साहेब व बापाजी बसोन बोलणे जाले...कलम.

१ सो। बोलले कीं, "भगवंतराव गा। याचे पत्र आम्हांस आले कीं, आम्हीं पंढरपुर तुळजापुरचे यात्रेस जाणार असे असता आम्हांवर असा प्रकार कां केला ? आम्हांकडेस अपराध कोणता तो आम्हांस समजला पाहिजे. न करीता येथें आम्हांस आणून ठेविले त्यास आमची माणसे चालीस पन्नास तेथें राहीली ती हत्यारेसुद्धा आणवावी. त्याणी आम्हांजवळ असावे व आमची चीजवस्त झाडून आणून द्यावी. लोकाची देणेघेणी आहेत ती देऊन मग आम्हांस जिकडे पाठवावयाचे असेल तिकडे पाठवावे. येणे प्रो। मजकुर होता त्याचा जबाब आम्हीं पाठविला कीं, तुमची चीज-बस्त जे कांहीं तुम्हांस पाहिजेसे असावयायोग्य ते आणऊन देऊ परंतु माणसेच आगोधर यावयाची नाहींत, त्यात हत्यारबंदाचे नांव कशास ? आमची चाल नाहीं देणेघेणे वगैरे दुसरी चीजवस्त असेल येवीसी गावांत कोणी आपला असेल त्यास सांगावे म्हणजे तो तजवीज करील. येणे प्रो। सांगून पाठवीले." बापाजी बोलले ठीक आहे. नंतर साहेब बोलले भगवंतराव कोण व बडोद्याहून कोणे रीतीने आले व येथें आल्यावर कसा प्रसंग घडला हा सांगा व त्यावरून सविस्तर मजकूर बापाजींनी सांगीतला...कलम.

२ बापाजी बोलले कीं पलटणचा मुकाम कोठें आला ? तेव्हां साहेब बोलले लोणीस आला असेल. कर्नल साहेबाचा सरंजाम खराडीस जाऊन उतरला. भगवंतराव व बंधूजी तेथे पाठवीले आहेत. उदईक त्रिंबकजी कर्नल साहेबाचे लोकाचे स्वाधीन होऊन कुच होऊन चिंचवडास मुकाम जाईल...कलम.

३ बापाजी बोलले कीं, श्रीमंताची व पोट साहेबाची बैठक खलबत जाहाले म्हणोन ऐकीले त्यांत सदाशीवपंतभाऊ नवते. तेव्हां साहेब बोलले खरे आहे. त्यांत बोलण्याचे भाव मिलोन सफाईचे श्रीमंताचे म्हणे जाले ते जाले इतःपर साहेबी संशय धरू नये व मागे जसा क्रम चालत होता तसा चालावा हे अर्थ होते. दुसरे कांहीं नाहीं. बापाजी बोलले चौकशी होण्याचेही असेल. साहेब बोलले, ते कांहीं नाहीं व चौकशी कराही म्हणणार नाहींत असे मला वाटते. बापाजी बोलले, प्रथमच त्याची बोलणी चौकशी करू नये परंतु पुढें त्रिंबकजीस हाती द्यावयाचा ठरेल तेव्हां त्याजला वाटेल कीं आतां आपण बहुत ना म्हटली परंतु हे चौकशी केल्याशिवाय राहणार नाहींत तेपक्षी आपण हीमतीची गोष्ट सांगावी कीं चौकशी करा. हे सर्व दाखवयाचे परंतु अंतरयामी चौकशी करू नये. साहेब बोलले त्याचे म्हणणेच पडले कीं चौकशी करा तर आम्हांस यांत फार संतोष आणि आम्हींही चौकशी करून बोलल्यास पुढे वीशेष वाढवावयाची गरज नाहीं......कलम.

४ साहेब बोलले, चौकशी होणे चांगले, न चांगले व त्रिंकबजीस आसा प्रकार जाला येवीसी लोक काय म्हणतात ? बापाजी बोलले, चौकशी जाली असता चांगली अथवा वाईट असे कोण येऊन बोलतो ? परंतु त्रिंबकजीस असा प्रकार यात बहुत जणास संतोष जाला दाहा पांच सुध त्याचे लगत्याचे असतील त्यास मात्र काय वाईट

वाटले असेल ते वाटो. तेव्हां साहेब बोलले सर्व लोक त्रिंबकजीनी शास्त्रीस मारला असें म्हणतात व बाहेरही शेपन्नास कोसी असेंच बोलणे आहे. बापाजीनी उत्तर केले कीं येक ब्राम्हण रामेश्वरीहून आला त्याणे मार्गात वर्तमान ऐकीले ते त्याणे सांगीतले. त्यातही त्रिंबकजीने मारला म्हणोन लोक बोलतात हाच अर्थ आहे. मग काय असेल ते असो...कलम.

सदरहु बोलणे होऊन लष्करांत येऊन आम्हांस मार सांगीतला.

85]

Copy of Bāpu Mairal's diary for 25-9-1815 recording Bāpāji's interview with Elphinstone at the Poona Residency :—Elphinstone informed Bāpāji of Bhagwantrāo Gāikwād's complaint about maltreatment at the hands of the British Government. Bāpāji gave the required details about Bhagwantrāo to Elphinstone. Conversation about Trimbakji's share in Gangādhar Shāstri's murder also took place. Bhagwantrāo and Govind Vishwanāth are under military watch said Mr. Elphinstone, and Trambakji will be placed along with them.

---

86] [29-9-1815

पो आश्वीन शुा ६ रवीवार संा १८७१ नकल.

श्री.

रोजनीसी स्वारी पुणे सुमा सीत आशर मयातेन व अलफ माहे शवाल भाद्रपद मास छ २५ रोज वाा ११ भृगुवार च्यार वाजतां सोकडे

बापाजी बंगल्यास गेले. आंतील बंगल्यांत सोाची मुलाकात होऊन बसोन बोलणे क...कलम.

१. साहेब बोलले, "आज आम्हीं श्रीमंताकडे सांगून पो कीं त्रिंबकजीस हती देण्याचा ठरला. ते काली पुढें तपास वगैरे होऊ नये म्हणोन आपले बोलणे. ते काली आम्हीं माहाराजास सांगून पाठवीलें कीं डेंगले हाती आले म्हणजे पुढें लांबवाण्याचे आमची खाईस नाहीं येणेप्रो सांगून पाठवीले होते. नंतर पुन्हा माहाराजाचे बोलणे कीं तपास व्हावा हे चांगले. त्याचाही जाब सांगून पो होता. परंतु दरम्यान कांहीं बोलणे नाहीं याजमुळें हाली सांगून पाठवीतात कीं माहाराजाची मर्जी जर तपास करावयाचीच असल्यास आमचे तर्फेनी ना नाहीं. वरकड आमचे बोलणे त्रिंबकजी हाती द्यावा ते आपण केले. पुढे कांहीं प्रकर्णी लांबवावे हे आमची खाईष नाहींच परंतु माहाराची मर्जी असेल तसे कलवावे त्याप्रो आम्हीं हजर आहोत. याप्रो सांगून पो आहे. हे तुमचे ध्यानास कसे येते!" बापाजीनी उत्तर केले कीं, " आपण सांगून पाठवीले चांगले कारण श्रीमंत हाली तर बोलणार नाहीं परंतु दोनाच्यार मास जाऊन मग सहजात बोलले कीं त्रिंबकजीचा तपास व्हावा हे आमचे बोलणे होते परंतु त्यांतील कांहीं येक घडले नाहीं. तस्मात हे करणें तुम्हांस आवश्यक होतें. निमीत्य मात्र हे काढले असे बोलतील ते काली तरी अझून काय जाले चौकशी करावी, करतो, असे बोलले पाहिजे. ते कशास पाहिजे! आतां सांगून पो हें चांगले केले. जे त्याचे मनांत आसेल तसा जाब येईल. तपास न करावा असा जाब आल्यास पुढें जबान बंद पडेल. करावा आसा जाब झाल्यास ठीकच आहे. त्यासही हाजरच." तेव्हां सो बोलले, "तुम्हीं जीतके आंदेशे बोलला हे मनात आणून सांगून पो पाहावे काय जाब येतो."...कलम.

२. सो बोलले "त्रिंबकजी बराबर आम्हांकडील साहेब गेला आहे. त्याजला मी पत्र लीहीले त्यांत मार कीं, त्रिंबकजीस जाहीर करावे कीं

आम्हीं तुजला मुंबईस नेतों परंतु तुझे जीवास भय नाहीं. स्वस्थपणे तेथे असावे. खर्चविचाचा वगेरे बंदोबस्त चांगला करोन कोणीवीसी फीकीर करू नये. येणेप्रो। खातरजमा करून ली।। होते तो मार सोनी त्रिंबकजीव सांगीतल्यावरोन आपले ठीकाणी फार आजुर्दा होता. तो आतां हे ऐकून खुषी जाला म्हणोन सो। ली।। आहे." नंतर सो। बोलले कीं, "त्रिंबकजीचे मनांत आंदेशा फार होता कीं गायकवाड यांचे हवाली करीतात" त्याचे उत्तर बापाजींनी केले कीं "गो। त्रिंबकजीस कशास मागतील ?" तेव्हां सो। बोलले, "प्रत्यक्ष खुनी जर हजरच आहे तर मग चिंता काय ?" बापाजी बोलले, "येद्यपी असे जरी आहे तत्राप मागणार नाहीत कारण तुम्ही दोस्त. तुमचे जवळ आहे तोच आमचे खास जवळ आहे. त्यात त्रिंबकजीस मागून गो। आपला दावा बुडवीतील असेही घडणार नाहीं व व चालही नाही. आमचे खावंदाचा मीलोन आमदाबाद घ्यावी हाच अर्थ ?" बाबाजींनी उत्तर केले "वाजबी कीं गेरवाजबी याचा विच्यार आपण करावा. गायकवाड काही पेशवे सरकारापासून आहेत आसे नाहीं, राज्यापासून आहेत. नाना।सो।, भाऊसो। यास दमाजीराव गायकवाड भारी वाटले. सा। दाव नेलभंडार देऊन फेऱ्यांत आणून आर्धी गुजराथ दग्याने घेतली, तो उगवण्याची वेल हेच आहे." तेव्हां सो। हे ऐकून येक घटका पर्यंत हसत होते. नंतर दमाजीराव कसे आले कसकसा प्रकार जाला हा सो। बी विच्यारील्यावरोन सांगीतला...कलम.

३. सो। बोलले "बापु देवजी याजसमागमे बालेबाबांकडे तुम्हीं सांगून पो। त्याचा जाब आला कीं नाहीं ?" बापाजी बोलले "देवजी आज आले होते, त्याचे सांगण्यांत कीं सविस्तर मार बालेबास सांगीतल्यावरोन त्यास बहूत संतोष जाला आणि बोलले कीं हे सर्व प्रकार खरे आहेत. माझी प्रकृती ठीक नाहीं. म्हणून गेलो नाहीं. आज येकादशी उदईक श्रीमंताची गाठ घाल्न खासमहा मार श्रीमंतासी बोलून याचा जाब

कलवीतो. येणप्रो मार जाला. बालोबा श्रीमंतासी बोलले 'म्हणजे सांगून पाठवीतील त्याप्रो पुढ आपणास कलऊ.''......कलम.

४. सो बोलले "गावात गपा कशा आहेत? बापाजी बोलले, "मनस्वी आहेत. त्या सांगण्यातही लज्जा वाटते व आशा गप्पा उच्चार करणेही चांगले नाहीं. आज दोन हाजर फौज श्रीमंताची आली म्हणोन ऐकीले." तेव्हां सो बोलले "त्रिंबकजीकडील सामान अष्टीवर होते ते आले आहे. त्याजला एखादा सरदार करोन त्याचे जीनस सामान करणार म्हणोन श्रीमंतांनीं आणवीले आहे. दसरा जाल्यावर ठीकाणी जाईल."...

कलम.

५. बापाजी बोलले "त्रिंबकजीकडील मामलतीची घालमेल होते म्हणोन ऐकतो." सो बोलले "असेल परंतु ऐकीले नाहीं."...कलम.

६. सो बोलले कीं, "बडोद्याची काय खबर आहे?" बापाजी बोलले कीं, "चांगली आहे." सो बोलले "सितारामाचा बंदोबस्त चांगला जाला कीं नाहीं?" बापाजी बोलले "त्याजला कुटुम्ब कबील्यातून आलाहीदा करून पंचवीस बारगीर सरकारचे व शंभर लोक कंपनीकडील याची चौकी आहे." सो बोलले "बंदोबस्त आमचे खातरखा जाला नाहीं"...कलम.

सदरहु प्रो बोलणे होऊन लष्करांत येऊन आम्हांस मार समजावीला.

86]

Copy of the Diary of the Poona mission :—Bāpāji Arcotkar interviewed Elphinstone. A talk about the trial of Trimbakji Dengḷe and the attitude of Bājirāo II towards it took place. Trimbakji was assured of good treatment and the fear in his mind that he would be handed over to the Gāikwāḍ was

allayed, said Elphinstone. Bāpāji informed Elphinstone that unspeakable rumours were afloat in the city and that at Baroda Sitārām was kept under a 120 strong guard.

---

87] [4-10-1815

नकल

पो आश्वीन शुा ११ भृगुवार सा १८७१.

श्री.

रोजनीशी स्वारी पुणे सुमा सित अशर मयातेन व अलफ माहे शवाल आस्वीन शुा २ छ ३० रोज बुधवार च्यार वाजतां सोाकडे बंगल्यास आम्हीं व बापाजी गेलो. दस्तुर माफक मुलाकात होऊन आतील बंगल्यांत साहेब व करोस सोा व आम्ही उभयाता बसुन परस्परे तबीयत खुशी होऊन बोलणे जाले.......कलम.

१ साहेब बोलले "गावातील बातमी काय ? श्रीमंत रायगडास रूा व सरंजाम पाठवीतात म्हणोन ऐकतो." आम्हीं उत्तर केलें कीं, "आम्हींही ऐकतो." सोा बोलले कीं, "पुढें इरादा काय दीस्तो ?" आम्हीं बोललो कीं, "कलेल. लढाईचा इरादा उघड दृष्टीस येत नाहीं. परंतु आन्तरयामी भाव खरा." सोा बोलले, "आम्हांसही असें वाटते कारण रायगडास सरंजाम रवाना करतात व फौज जमा करीतात यामुळें आम्हांस आंदेशा खरा." आम्हीं बोललो कीं, "याचा विचार काय ?" सोा बोलले, "दसरा जालीयावर जर फौज अशीच राहीली तर मग आम्हांस विचार

कर्णे प्राप्त. तोपर्यंत आम्हीं बोलत नाहीं. कारण श्रीमंत आम्हांसी बोलले आहेत कीं त्रिंबकजीचे फौजेस सरदार नेमावयाकरितां व दसऱ्याकरितां फौज आणवीतो. याजमुळें पुढें पेंढारी वगैरे यांचे बंदोबस्तास फौज जेथें होती तेथें गेली तर मग आंदेशा मिटला, नाहीं तर त्याची फीकीर करणें आम्हांस लाजम आहे"...कलम.

२ आम्ही बोलले कीं, "श्रीमंताकडून कांहीं जाबसाल सुरू आहे किंवा बंद आहे ? तेव्हां सो। बोलले, "बंद नाहीं. मोर दीक्षीत व पोट सोाचे मार्फत कांहीं चालु आहेत. पोट सोाच समागमे निरोप आला होता कीं, हाली जाबसाल झाडून बंद आहेत. या बखेड्यामुळें तो मीटला. त्यास पुढें जाबसाल चालु व्हावे. आमचे पांचचार जाबसाल मोठे हैद्राबाद वगैरेचे ते चालु व्हावे. त्याचे उत्तर आम्हीं सांगून पो। कीं, बहुत चांगले आहे. चालु करावे परंतु एकतर नवाबाकडील दुसरे च्यार कोणते ? कलवावे, त्याप्रो। बोलूं. याचे उत्तर आलें नाहीं. ते आले म्हणजे कलेल...कलम.

३ आम्हीं बोलले कीं, "बडोद्यास आमचे खावंदाचे हुकुमाप्रो। दसरा जालीयावर जाण्याचे परंतु आपले सलेनी यावे असा पहिलाच हुकूम आहे. व पेशजी पेशवे सरकारचे बोलणे आपल्यासी आम्हीं न जाण्यावीसी होते त्यावरून आम्हीं आपले खावंदास लीो."
त्याचा जबाब "आमचे खावंदाचे पत्र आल्यावर मदार समजेल तसे आपली सला कसी हाही इशारा येईल." त्यावरून बोलले कीं "आपली सला आपण पेशवेसरकारासी बोलण्याचा मदार काय चीतात योजला आहे ?" तेव्हां सो। बोलले कीं, "लाट सोास मार लीा। आहे त्याचा जबाब येईल त्याप्रो। करता येईल." आम्हीं बोलले, "जाब येण्यास आवकाश कीती ?"

सो। बोलले, "तो सांगवत नाहीं." आम्हीं बोलले,

"पुढें जावयाचे राहावयाचें कसें करावे येवीसी आपली सला काय?
आमचें सरकारचा हुकूम तर जसी सोची सला त्याप्रो वर्तणूक."
सो बोलले, "लाट सोचे पत्र आले त्यांत मार होता त्रिंबकजी
हस्तगत जाला आस्ता मग बापुसो राहवयास चिंता नाहीं.
नाहीतर मार्गस्त करावें. तो मार सांगितला व हालीही जसे
उत्तर येईल तसे सांगेन." आम्हीं बोललो कीं, "लाट सोचे
पत्र येण्यास तर आवधी, आमची तयारी मागेच जाली व
दस्तकेही पेशवे सरकारची आली परंतु आम्हीं राहीलो. बायश
होता हाली दसरा जालीयावर. पुढें पेशवे सरकारचे आमचे
राहावयावीसी बोलणे पडले तर व आमचे सरकारचा नफा दृष्टीस
येत असला तर आमचे राहण्याचे सार्थक. नाहींतर व्यर्थ राहून
कांहीं न होता मग जाण्यांत ठीक नाहीं." तेव्हां सो बोलले,
"पेशवे सरकार तुम्हीं राहणे म्हणून वीसवले. आम्हांसी बोलले."
आम्हीं बोललो कीं, "त्रिंबकजी हस्तगत जाला नवता तोपर्यंत
बोलत होते." सो बोलले "नंतरही बोलले आहेत." आम्हीं
बोललो कीं "आमचे बोलण्याचा मदार तर लाट सोचे पत्र
आल्यावर ठरेल परंतु आपण आपले दीलात कीयास काय केला?"
सो बोलले "आजपर्यंत मिलोन काम त्रिंबकजीचे. दुसरा विचार
नवता. हाली पेशवे सरकार साफ चालते कींवा कसी मसलत
हा विचार. यामुलें आम्हीं तुमचे प्रकर्णी विचार केलाच नाहीं."
आम्हीं बोललो "विचार जरूर केला पाहिजे." सो बोलले कीं,
'विचार करीतो परंतु आमच्यानें पेशवे सरकारासी बोलवत
नाहीं. कारण आम्हीं एखादा विचार करोन बोललो. आणि
लाटसोचा हुकूम दुसरा आला तेव्हां ते ठीक नाहीं. तुमचे
बोलणे तर आमदाबाद द्यावी आणि मागील पुढील जाबसाल
साफ." आम्हीं बोललो कीं, "आम्हीं बोलतो हे वास्तविक कींवा

गेरवास्तविक याचा विचार आपण करावा. आमचे सरकारचा कारभारी उमदा मनुष्य मोठे मर्तब्याचा. त्याचा खून पेशवे सरकारांत जाला. तसे आम्हांकडून कांहीं फेल किंवा फीतुर किंवा दुसरे कांहीं खूल तो अर्थ कांहीं नाहीं. फक्त आमचे सरकारचा जाबसाल बोलून च्यार रुा जे ठरतील ते देऊं. खावंदास वस्त्रे घेऊन जावी हा इरादा आमचा आस्ता आसा प्रकार जाला. यांत गाासरकारची नाखुषी केवढी जाली व दुरमतीचा वास्ता जाला. तेव्हां आमचा दावा पेशवे सरकारशी. त्यांत पेशवे सरकारांनीं आम्हांपासून निमे गुजराथ दगा करोन बेलभंडार देऊन दमाजीराव यांस धरून केद केले. मूळ दाभाडे याचे पदरचे गाा. तेव्हां दाभाडे यांस दोन कीताब. एक सेनापती व दुसरा सेनाखासखेल हे पद देऊन निमे गुजराथ दिल्हीं व सेनापती पदाबाा निमे गुजराथ घेतली ते सरकारात ठेवीली. नंतर पुढें सालाबादी व फौजेचा ऐवज जसजशी जबरी पडत गेली त्याबाा साधनुक केली तोही प्रकार आपण पाहावा. आजपर्यंत गाा डावे हातानी रामराम पेशवे सरकाराशी करतात हा दाखला आहे. तेव्हां हा प्रकार जाला. याजमुळें आमचा दावा पेशवे सरकारावर पुर्ता आहे." सोा बोलले "पेशवे सरकार म्हणतील कीं, त्रिंबकजीस खाली केला. आता आम्हांकडेस दावा काय?" आम्हीं बोललो "त्रिंबकजी खाली जाला हा आमा करितां नव्हे. यद्यपी शास्त्रीबावाचा प्रकार होताच श्रीमंतांनीं तपास करोन ठीकाण लाऊन शासन केले आस्ते तर मग ठीकच होते. ते न करितां तुम्ही आपले बहादरीकरितां पेशवे सरकाराशी बोलला. त्यांत तंटे पडून सोास मेहेनत किती पडली व किती प्रकार जाले तेव्हां हे घडले. यांत कंपनी सरकारचे जे...म जाले. आमचे सरकारचे कांहीं नाहीं. त्रिंबकजी हाती घेणे हे गायकवाड सरकाराकडे नाहीं. तुम्ही

बहादरीचे सबब हे केले. यांत आम्हांस फायदा काय ? यामुळे आमचा दावा शाबुद. व आमचे लोकांत चोलही खरी. असा प्रकार जाला आसता त्याची समजुत व्हावी." तेव्हां सो बोलले "पेशवे सरकार म्हणतील कीं, आम्ही भाऊस समाचारास पो होते व शास्त्रीबावाचा प्रकार जाला याची गपगीरी गो सरकारास तशी आम्हांसही बहुत." आम्हीं बोललो "भाऊ आले आशानी समजुत नाहीं. गपगीरीचा प्रकार जर पेशवे सोस गपगीरी असती तर तो प्रकारच भिन्न असता. याकरितां आशा बोलण्यांनीं गो सरकारची समजुत नाहीं. कारण पेशवे सरकाराकडे मोठेपणा, आणि त्यांचे दरबारात हे गोष्ट घडली तेव्हां गो सरकारचा हर्फ पेशवे सरकारावर. तेव्हां त्याजला लाजम कीं, गो सरकारची समजुत करावी." सो बोलले "तुमचे बोलण्याचा प्रकार आतांही मी लाट सोस लीहीतो, त्याचा जाब येईल तसे घडेल." आम्हीं बोललो, "ठीक आहे परंतु पुढे आम्हीं मुलाबुधा राहावे किंवा मुलास मार्गस्त करोन मी राहावे किंवा आम्हीं मुलासह जावे याचा विचार काय ?" तेव्हां सो बोलले, "तुमचे ध्यानांत कसें येते ?" आम्हीं बोललो कीं "आपण सांगाल त्याप्रो वर्तावयाचे. अधिक उपाय केला पण चालावयाचा नाहीं. तत्रापि आपण पुस्ता यामुळे सुचले ते सांगतो. पेशवे सरकार इतके दिवस आपल्याशी बोलले, आलीकडे बोलत नाहींत. त्यास त्याणी होऊन जर गोष्ट आमचे राहण्याची काढली तर मग आमचे राहणे जाल्यास चिंता नाहीं, न बोलले तर दसरा जाल्यावर आम्हीं जाऊं." सो बोलले "ठीक आहे. पेशवे सरकार आम्हांसी तुमचे प्रकर्णी बोलले तर जाब देऊ कीं, इतके दिवस आम्हीं गो सरकार प्रकर्णी बोलत होतो त्यास आम्हांस लाट सोचा हुकुमही आला होता, हाली असा प्रकार जाला; तेव्हां जाबसाल नवा जाला तेव्हां...(फाटलें आहे)...

समक्ष नाहीं. लाट सोास मजकुर लीहून उत्तर येईल तसे करू. बापु सो येथे आहेत त्यास आपण बोलावे. आम्हीं ही त्यांसी बोलुं. येणेप्रो बोलुं परंतु तुम्हांकडे पेशवे सरकारातुन कोणी बोलावयास आल्यास तुम्हीं जबाब काय द्याल?" आम्हीं उत्तर केले कीं, "आपल्या सीवाय बोलणे होऊन नंतर आम्हांकडे कोणी बोलावयास आला तर आम्हीं जाब देऊं कीं, आमचे सरकारचा हुकूम तर राहू नये असा आला, परंतु आतां आपण म्हणता ठीकच आहे. आम्हीं आपले खावंदास लीहीतो. तेथुन हुकूम येईल त्याप्रो करू असा जाब देऊं." तेव्हां सो बोलले "ठीकच आहे." आम्हीं बोललो कीं, "कर्णेक सोचे पत्र अलीकडेस आले होते कीं नाहीं?" सो बोलले "नाहीं." आम्हीं बोललो "मुंबईस जनराल सोसही पुढें कसा प्रकार करावा येवीसी आपण लीहीले तर कसे?" सो बोलले "ठीक आहे. लीहू. परंतु तुमचा मदार पेशवे सोचा दावा उडून आमदाबाद घ्यावयाचा हे कसे घडेल? आम्हीं जाब दिल्हा कीं, "कंपनी सरकार इनसाफ तपासतील तेव्हां लाजम तेच मनांत येईल. कदापी आमदाबाद पेशवे न देत तरी आमदा-बादची मामलत चालू दस्ता ठरऊन घ्यावी. करारापो हे काम देता येईल. आमदाबादचे याप्रमाणे जाले आस्ता हरवक्त तंटा नाहीं व काठेवाडांत बाहादरी नीरंतरची आहे त्यास खलेल नाहीं. हे न जाले तर बाहादरीत खलेल व हरदु अमलामुळे हरवक्त तंटे पडून नाखुषी पेदा होईल व सोस मेहेनत पडेल. याकरितां हे लाट सोस लीहून तेथील सला घेऊन हे जरूर जाले तरच ठीक आहे." सो बोलले "हे तुम्हीं म्हणता हे प्रमाण आहे परंतु पेशवे सरकार फायदा कोठे पाहातात? तत्राप आमदा-बादचे मोबदल्यास माहाल देण्याचे कसे?" आम्हीं जावाब दिल्हा कीं, "माहाल द्यावयाजोगे कोठे आहे? पेशवे सरकारसी

बोलून त्याचा दिल राजी करोन आमदावाद ठरऊन दिल्हात तुवता आपल्यास मेहेनतीचीसी व आम्हांस तंट्याचीसी पडेल. पेशवे सरकारास कराराप्रो ऐवज पावेल. हे न जाले तर आपल्यास मेहेनत व आम्हांस तंटे व पेशवे सेाास पैका मिलणे कठीण. ऐसे तिघास तीन गोष्टी फायद्याच्या आहेत." तेव्हां सो। बोलले "पेशवेसाहेब हे करतील न करीतील तुम्हांस कसे वाटते?" आम्हीं जवाब दिल्हा कीं, "हालीचा वख्त पाहता कदापी कबूल करणार नाहींत. परंतु सोचे समजावील्यावरून समजतीलही खरे." तेव्हां सो। बोलले "डेगले असता काठेवाड प्रकर्णी चीकीर फार चालली होती, हाली कसे होईल ते पाहावे. फीकीर मोठी आहे...कलम.

४ सो। पुसले कीं, "होलकर यांचे लष्करांत फतेसिंगराव बाबाचे सासरे दमदेरे आहेत. त्यांचे पत्र बाबालोस आले होते कीं, होळकर यांची तयारी आहे असे आम्हीं ऐकोले तुम्हीं ऐकीले कीं नाहीं?" आम्हीं जवाब दिल्हा कीं "ऐकीले नाहीं. दमदेरे तिकडे आहेत. त्यांची पत्रे येतात, परंतु या वर्तमानाचे पत्र आल्याचे कलले नाहीं."

५ आम्हीं विचारीले कीं, "सिंदे होलकर यांचे येथील येखबारा येतात त्यांत त्यांची तयारी दिसते कींवा कसे हे काय वर्तमान?" सो बोलले, "थोडी थोडी तयारी बोलतात परंतु तयारी नाहीं. पेंढारी नर्मदा उतरले नाहींत. मीरखानही दूर लांब त्या देशांत आहे." ...कलम.

६ "त्रिंबकजीस वाराणसीस पाठवावे असे भाव परंतु लाट सोचे हुकुमाप्रो घडते ते घडेल,"...कलम.

७ सो विचारले कीं, "सितारामबावाचा बंदोबस्त पका जाला कीं नाहीं ?" आम्हीं जाब दिल्हा कीं, "कंपणीकडील लोक व बाबासोाचे खास पागेचे लोक चोकी बसोन त्याजला कबील्यापासून आलादा ठेवीले." तेव्हां सो बोलले कीं, "बडोद्यांत ठेवणे लाजम नाहीं. कारण फीतुर मिटणार नाहीं." आम्ही जाब दिल्हा कीं, "त्याचे दिलांत वाराणशीस जावे, राहावे ऐसेही आहे." तेव्हां सो बोलले "कंपणीचे चौकीत वाराणसीस असले तर चिंता नाहीं परंतु चौकीविना खुले राहीले तर भर्वसा त्याचे फंदाचा नाहीं. पहिले हफीज गुलाम याचे मार्फत फंद बहुत लांब करोन पत्रें पाठवीली. हाली वाराणसीहून सरदार दौलतदार जवल तेव्हां हे फंद करण्यास चुकणार नाहीं. यांजकरितां खुले ठेऊ नयेत. चौकीत असल्यावर चिंता नाहीं." आम्हीं जाब दिल्हा कीं, "बडोद्यास खावंद व रसीदेंट यांचे सलेनीं घडेल ते खरे"....कलम.

सदरहु बोलणे होऊन रजा घेऊन दोन घटीका रात्री लष्करांत आलो.

87]

Copy of Bāpu Mairāl's diary for 4-10-1815 reporting his interview with Elphinstone. The talk opened with a reference to the despatch of men, money and munitions to Fort Rāigad by the Peshwa, a step likely to raise suspicions. Elphinstone remarked that he would wait till the Dasra and see if the forces were sent back from Poona to the districts. He informed Bāpu that the Peshwa had reopened negotiations with some States through Mor Dikshit and Mr. Ford.

A long conversation followed, Bāpu asking

Elphinstone's advice about continuing his stay in Poona and Elphinstone refusing to give advice without instructions from the Governor-General on that point. Bāpu had to narrate during his conversation of the unfair treatment received by the Gāikwād from the Peshwa since Damāji's time and to affirm that it was the Peshwa's duty to satisfy the Gāikwād for these injuries culminating in the murder of the Baroda ambassador. The subject of the farm of Ahmedābād was then discussed and doubt was expressed as to whether the Peshwa would again give the farm to the Gākwād. The movements of Shinde and Holkar, the whereabouts of the Pendhāris, the fate of Trimbakji and the incarceration of Sitārām were the other topics of conversation.

---

88] [14 Dec. 1815

श्री.

नकल.

श्रीमंत राजश्री बाबासाहेब साहेबाचे सेवेसी,

आज्ञाधारक बापु मैराल कृतानेक आशिर्वाद विज्ञापना येथील कुशल ता। छ १२ माहे मोहरम पावेतो मुकाम भामरडे नजिक पुणे जाणोन स्वकिये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष इकडील मा। छ ८ मीनहुस लीहून पत्र शेवेसी पा। पाऊन अवगत जाले असेल. चिरंजीव राजश्री भीमाशंकर रावजी सरंजामसह तेथे पोचलीन (?) साहेबाची स्वारी

सामोरी जाऊन सत्कार करोन भेटी जाल्याच कललेवरोन सोचे भुशण विलसोन ज्यनात प्रसरले. येणेकरून बहुत संतोष वाटला. इकडील मजकुर कलमबंदी.

छ ८ रोज पेंढारी आठ हजार जमाव गारदोंडेस रोज मुा पर्यंत मुा करोन होते. रावणगाव लुटोन पटपारगावात डेंगले याजकडील पागेची घोडी होती ते नेली. पाटसची खावडाखाबड जाली म्हणोन वर्तमान ऐकीले...कलम १.

छ ९ रोज आंताजीपंत डभईकर डभईस जाण्याकरितां निघाले ते पुसावयासी आले होते. त्याणी सास विनंतीपत्र बरदास्तीवीसी मागितले व जमिदाराचे खात्रीवीसी बोलले परंतु जमिदाराची समजुत पडली नाही. सबब कारकुन ठेऊन ते निघोन तिकडे आले. कारकुन याचेनी जमिदाराची समजुत जाल्यास खातरी करून पत्र शेवेसी लहुन देईन....कलम.

छ १० रोज पेंढारी याणी सोनई, बामणी, राहुरी, वामोरी लुटले. कांहीं जालली व कांहीं विंचुरकराकडील स्वार मार्गात लुटोन घोडीसुद्धा नेली म्हणोन वर्तमान पुणीयात ऐकीले....कलम १

छ ११ राजश्री सदाशिवपंत भाऊची प्रकृत बरी आहे व अनुष्ठानें समाप्त करून दक्षणा दिल्ही. धुन्डीराज मल्हार भाऊचे तर्फेनी श्रीमंताकडे जात येत होते. छ ९ रोजीं वारले सबब त्या कामावर श्रीमंताकडे भाऊचे तर्फेनी रामचंद्रपंत यास भाऊनी नेमुन श्रीमंताकडे जात येत असतात...कलम १

छ १२ रोज पेंढारी पंढरपुरकडे आहेत त्याचा दंगा आहे व माधवराव जोशी यांजकडे सरकारातुन साल मारी पो नेवासेची मामलत

सांगितली. तेथे कारकुन जाता मार्गानी पेंढारी याची गाठ पडून घोडी तट्टे लुटून गेली व कारकुन धरोन नेला. कोल्हापुरचे स्वामीचे सवस्तानास उपद्रव निपाणकरांनीं केला म्हणोन स्वामिकडील कारकुन सरकारात विनंती करावयासी आले, त्याणी समजाविलेवरोन निक्षुन ताकीद तरी जाली परंतु अनुचित घडणार नाहीं. इतकी अक्षरे मात्र श्रीमंत बोललेवरोन निपाणकर याणी स्वामिची समजुत करावी म्हणोन सांगलींहून निपाणीस स्वामिस नेले आहे म्हणोन स्वामिकडील कारकुन याणी सांगितले. इमाम मालदार याज-कडील सरंजाम धारवाडास सरकारातुन जात होता तो जवल-पास जाता धारवाडकरानी छापा घालुन वातहत केले व सरकारातुन शंभर नागे गोसावी प्रयागास रा केले. ते जाता वराडांत पेंढारी याची गाठ पडून लढाई जाली. दहा पंधरा गोसावी ठार जाले व पेंढारी पंचवीस तीस ठार जाले व जखमीही जाले. येक पेंढारी खासा पाडाव जाला व वीस पंचवीस घोडी व दहा पंधरा पेंढारी पाडाव करून धरून गोसावी नागपुरास गेले म्हणोन पुणीयातील वर्तमान ऐकीले व आजम हनराबल इलफीष्टन साहेबाची स्वारी गोखले याजकडे मेजवानीस गेली होती...कलम.

सदरहु कलमबंदीवरोन मार आवगत होईल. आमदाबादचे रखवाली-करितां नगरकर याजकडोन येक कारकुन व पांच स्वार राजश्री आंताजीपंत डबईस गेले त्याजश्या गेले आहेत. डबई जंबुसर वगैरे पंचमहाल देक हुकमी धोंडोपंत जोशी यांजकडे. मामला. याजकडून वहीवाट आंताजीपंतकडे. धोंडोपंत नगरकराचे तेव्हां तेथुन सरंजाम आंताजीपंत देऊन रहदी पाठवितील ऐसे वाटते. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

88]

Copy of Bāpu Mairāl's newsletter from a suburb of Poona to Fattesingrāo. Bapu congratulates Fattesingrāo on his generosity in receiving the bereaved Bhimāshankar, son of the late Gangādhār Shāstri, personally on his arrival at Baroda and gives the following items of news :—

8000 pendhāris encamped near Dhond and looted villages in the Bhimthadi division (6-12-15);

Antājipant, agent to Dhodopant Joshi the revenue farmer to the Peshwa for Dabhoi, Jambusar etc. being appointed kamavisdar of Dabhoi, is leaving Poona for Dabhoi (7-12-15);

The Pendhāris looted villages near Ahmednagar not sparing the horsemen of the chief of Vinchoor (8-12-15);

Pendharis are molesting Pandharpur and its vicinity. The Chief of Nipāṇi having damaged the property of Shri Shankaracharya of Kolhāpur and a complaint against the Chief being lodged with the Peshwa, Shri Shankaracharya has been invited to Nipāni for a compromise. A skirmish between the naked gosais and Pendharis in Berar resulted in the success of the former. Bāpu Gokhale, commander of the Peshwa's forces, gave a dinner to Elphinstone (9-12-15).

89] [After 1815

श्री.

विज्ञापना कैलासवासी वडील सो॥ पुणीयास जाते समई खासगीवाले यांचे घरी कांहीं दागीन्याच्या पेट्या वगैरे ठेवीले होते. त्यास हाली अजम सोाचे विच्यारे पेट्या आणोन तिजोरींत ठेवाव्या असा विचार करोन वद्य १ प्रातःकाली मजला खासगीवाले याजकडे सूचनेस पाठवीले होते. मी जाऊन विनंती केली कीं मुहूर्त संधीही आहे यास्तव मजला आपणाकडे पा॥ आहे त्याचे उत्तर जाले कीं बापशास बोलाउ पा॥ आहे ते येतील तुम्हीं बसावे. नंतर बापशाही घेऊन येकांती बोलणे होऊन नंतर मजकडे बापशा येऊन कांक्षा घेतली कीं आजच न्यावयाचे प्रयोजन काय ? चिरंजीव रावसो॥ येथे नाहींत ते आल्यावर न्यावे. असोत. तुम्हीं मुखत्यार आहात ते पक्षी देतो. परंतु श्रीमंताची ही स्वारी येथे नाहीं, परंतु अजम सोाचे कानावर घालून मग देऊं असे सांगीतले. त्याजवर मी येथे राजश्री बाबासोास जाला मा॥र श्रुत केला. नंतर त्याणी आजम सोाचे कानावर घालून खपेल्या एक मज समागमे देऊन पुन्हा खासगीवाले याजकडे पा॥ तथापी खपेल्यास एक वेल हीसका देऊन सोास पुसावयास पाठवीले कीं सगलेच द्यावे कीं काय ? नंतर तेथून उत्तर आले कीं झाडून असेल ते द्यावे. नंतर दाहा कलाक वाजल्यावर पेट्या जामदारखान्यातून उतरल्यावर तदुत्तर बंगल्यास अजम सोाकडे घेऊन गेलो तेथे बापशाही आले होते. त्याणी पावती साहेबाचे सहीची द्यावी असा आक्षेप घेतल्यावरोन बाबानी पावती दिल्ही वर सहीही जाली. आसा प्रकार या आंदेशाचा जाला याचे कारण पाहता कांहीं नाहीं. गुप्त वेव्हार होता तो दिवसमाहत्मे असा जाला, असोत. शेवेसी कलावे म्हणोन लीहीले आहे. शेवेसी श्रुत व्हावे ही विज्ञापना.

89]

Undated report from some agent of Bhimāshankar, son of the late Gangādhar Shāstri. He describes the

difficulties faced for recovering some boxes of ornaments kept confidentially by the late Shāstri in the custody of Vitthalrāo Bhāu Khāsgivāle, before departing for Poona and adds that the boxes were at last returned to him in the presence of the Resident.

---

90] 13-2-1816

श्रीशंकर

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री बजाबादादा गोडबोले स्वामीचे शेवेसी, पो। गोविंदराव देवाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रा। विज्ञापना ता। छ १४ माहे रावल पावेतो मु। अमरोली येथें क्षेम असो. विशेष तुम्हांकडून दोन पत्रें आली ती पावली. त्यातील मजकुर सर्व मनन केला आणि अजच वडीलाकडे राजश्री आबा मराठे याचीसुद्धा रवाना केली आहेत. आम्हाही लवकरच तीर्थस्वरूप राजश्री बाबाबरोबर येणार आहेत. वडोद्याकडील तर पर्याय काय लीहू ? माहालाची नेमणुक कारभारी याही केली आहे त्यात तर माहाल सोडावे असे अले हे व तसेच सुभ्याचीही व्यवस्था केली आहे. दादा ! वडील कैलासवासी याचे पाठीमागे जे करतील ते थोडे आहे. राजश्री कासीपंतदादा श्री यात्रेस आले आहेत व अर्चचेही अहे. वडील अज्ञाही आहे त्यावरून रवानगी आहे. सीबंदीची नेमणुक हुजरीहून आली त्याजवरून वडील अज्ञा कीं, "कोडीनार खाते नऊसे रूपयाची सीबंदी ठेवावी तर जास्ती जी असेल ती बर्तफ करण्याचीसी तीा राजश्री दादासो। याही लीहीले आहे. त्याप्रो। करावे." कोठारचे ? काम सदोबादादाकडे अजपर्यंत सांगितले नोव्हते आजच मी सुभेदार सो। यासी बोलऊन सांगवीले. राजश्री जयरामबावास पत्र वडील सो।चे आल्यापासून ज्वर येत आहे. दादा ! आमरोलीकडील सर्व मंडली दिवाण वगैरे दिलगीर आहे. बहुत काय लीहीणे लोभकीजे हे विज्ञापना.

90]

Reply from Govindrao Devāji (Amreli) to Bājāba Dāda *i.e.* Yeshwantrāa Godbole (Kodinar). Govindrao says he has sent back Aba *i.e.* Krishnarao Bāpuji Marāthe and Bāba *i.e.* Yeshwantrao Marāthe to Baroda as desired by Godbole. Govindrao is sorry that all the administrative arrangements are being altered after Gangādhar Shāstri's death. He adds that he has been ordered by his brother Vitthalrāo to keep only Rs. 900 worth of sibandi troops at Kodinar and to dismiss the rest. He remarks that a gloom has spread over all the persons at Amreli including Vitthalrāo, the Kāthiawād Dewānji.

---

91] [9-3-1816

श्री.

राजश्रीयावीराजीत राजमान्य राजश्री बजाबादादा स्वामिचे सेवेसी, सेवक गोविंदराव देवाजी साष्टांग दंडवत प्रा॥ विनंती येथील कुशल ता॥ छ. ९ राखर मुकाम स्वारी नजिक खामरेजी ते॥ मालीये येथे यथास्थित असे विशेष आपण छ २३ रोावलचे पाठवीले त्या अलीकडे पत्र येऊन वर्तमान कलत नाहीं तरी वरचेवर पत्र पाठऊन कुशलार्थ लीहीत असावे. त्यानंतर विजया दशमी बदल कापड लोकास द्यावयास पाठवीले त्याप्रे॥ देऊन याद पाठवीली आहे ही घेऊन जमा खर्च करावा. उतर पाठवावे. दादा कापडाबदल याद पाठवीली आहे ती पावलीयाचे उतर पाठवावे व वरचेवर लोभयुक्त पत्र पाठवीत जावे. वरचील मा॥र वडील साहेबाचे पत्रावरून समजेल. कलावे बहुत काय लीहीणे लोभ कीजे हे विनंती.

91]

Letter written on 9-3-1816 to Godbole by Govindrāo Devāji Dighe from camp Khāmreji in the Mālia State acknowledging receipt of and enclosing a distribution list of cloth sent for the camp on account of the Dasara festival.

---

92] [11-6-1816

श्रीशंकर

राजश्रीयाविराजीत राजमान्य राजश्री आबा साहेब स्वामिचे सेवेसी. सेवक गोविंदराव देवाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रो विनंती येथील कुशल ता। ज्येष्ट कृष्ण व्दीतीया पावेतो मुकाम अमरेली येथे आपले कृपेकरुन यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लीहीत असावे विशेष आपण आल्या ता। येक पत्र छ ९ रोजचे पाठवीले ते पावले मजकडून पत्रे गेली नाहीत म्हणोन लीहील ऐसीयास दोन पत्रे येथून सेवेसी लीहीली ती पावली नाहीत यास माझा उपाय नाहीं. वलवाचा पाऊस बहुता दिवसी पडोन केली पडील्या याचे आश्चर्य नाहीं. गुदस्तापासोन श्रावर्षण होते तेव्हां केली नीर्जीव त्या वायु योगे पडतच आहेत म्हणोन लीहीले ऐसीयास आबासाहेब! अतीवृष्टी होऊन जमिन प्रफुल्लीत जाली ही माहीतगारी आपल्यास आहेच पिक कोणते जाले ते ल्याहावे. बहुत काय लीहू शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

92]

An imperfectly dated reply written from Amreli by Govindrāo, brother of Vitthalrāo Devāji, to Aba

i.e. Krishnarāo Bāpuji Marāthe (Kodinār) who had informed him of summer showers resulting in the destruction of a banana plantation. Govindrāo does not mind this destruction in view of the resulting crops and other benefits expected from the land after a year of drought.

---

93] [3-7-1816 to 10-7-1816

नकल

पो श्रावण शुा २ सा १८७२

श्री.

यादी दिनचर्या रोजनीसी वर्तमान स्वारी पुणे सुमा सबा अशर मयातेन व अलफ माहे साबान आषाढ मास इा वर्तमान छ ६ रो पो लीहून शेवेसी पाठवीले त्या आलीकडे दिनचर्या वर्तमान.

१ छ ७ रो नवलविशेष नाहीं.

१ छ ८ रो गुरूवार

१ रोज गुा श्रीकाशीयात्रा पुणे मुा आली व श्रीमंत राजश्री आमृतराव सोकडे तीलगुलाच्या थेल्या हुजरे घेऊन गेले होते ते आले त्याणी पेढारी याचा मार सांगीतला कीं उपद्रव फार आहे. उमरावती पासी आम्हीं पुढें व मागे गोसावी सावकार येत होते त्यास लुटले. आम्हांस देवाने बचावीले वर्तमान.

१ आबा पुरंदरे यांस जरीपटका सो नोबत चोघडा दिल्हा म्हणोन वर्तमान.

१ ...यांस म्याणा नेहेमी बसावयास दिल्हा म्हणून....

१ ..................लोकाची व त्याची तारांब्रल जागेवीसी व राहण्यावीसीच जाली व माणसास हगवणी लागल्या सा यंदा गेले नाहींत मुकामी राहीले आहेत.

.......

१ छ ९ रेाा भृगुवासर आधीकोत्तर नाही.

१ छ १० रेाा मंदवासर वेाा राजश्री मोर दिक्षित याजकडे विश्राम-बागचे हवेलीस आजम पोट सेाा व दुसरा येक सेाा येकुण दोन आा पांच घटका दिवस राहता आले होते. बोलत बसले होते. बोलुन गेले. वरकड कारकून मंडली वरील कचेरीत बसली होती.

१ छ ११ रेाा ताा छ १२ रेाा नवल विशेष नाहीं.

१ छ १३ रेाा भोमवार श्रीमंत सेाा वाराणासीबाई ताईसेाा बाईस प्रसुत व्हावयाकरितां गेली. त्यास ज्वर फार येत आहे म्हणोन वर्तमान ऐकीले. श्रीमंताची स्वारी पंढरपुराहून प्रतीपदेस निघणार म्हणोन वर्तमान टेंभुरणीकडोन येणार आसा बेत म्हणोन माार बोलतात व दोलतराव सींदे याणी जवाहीर खरेदी करितां पंन्नास हजारच्या हुंड्या पाा आहेत व हींदोराव घाटगे याणी पंचवीसहजार ...हुंड्या पेाा याप्रेाा माार.

१ छ १४ रेाा बुधवार नवलाविशेष नाहीं.

.......

सदरहु वर्तमान रोजनीसीवरोन श्रुत होईल हे विज्ञापना.

93]

Bāpu Mairāl's diary reporting Amritrāo's safe return from the Benāres pilgrimage, grant of *Jaripatka* and *nagāra* honours to Āba Purandare,-

expected delivery of Vārānashibāi Peshwa and the impending return of Peshwa Bājirāo II from Pandharpur.

---

94] [20 July 1816 to 23 July 1816

नकल.

पो श्रावण श्रा १४ संवत १८७२.

रोजनीसी आजम हनराबल ईलफीस्टीन सोाकडे जीवनराव यांस पो बोलणें जाले ते माहे साबान आषाढ मास सुमा सब्रा आशर मयातेन व अलफ.

१ छ २४ रो शनवार.

१ मागील फेसल्याच्या यादी वगैरे कागद पत्र मागीतले होते व रावजी कारकुन याजबरोबर छ २२ रोजी या दिवसी सांगुन पो होते त्यावरून आज जीवनराव याजबरोबर झासन ईहीदे सीतेन समान तीसेन पो फेसल्याच्या यादी पाठवील्या त्या जीवनराव याणी नेऊन दिल्या.साहेब बोलले आपीला पेशवे सरकार संमधी कागदपत्र आसतील...कलमबंद्या ठरावाच्या आणोन द्याव्या पेशवे सरकार...आदालत व कजीये...इंग्रजाची पलटणे लागुच होती त्यास बातमी कटकटीची समजताच चालुन ग्रेतले आणि रोहीले समस्त होऊन पलाले. ते काली पीवले भिंतीपासी लाख रोहील्याची जमेत आहे व हाली नेपालवाले याचा कीला घेऊन पुढे बद्रीकेदार या मार्गांनी च्यार रस्ते धरून पाहडावर जावे. तो नेपालवाले यास कलताच तह वीघडला आणि इंग्रजाची ठाणी जेथे जेथे बसली आहेत ती ऊठऊन घेत आहेत.

